






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

उद्या ? 10:32
10:32
कशी जाणारेस? 10:33
10:33
? 10:33
10:34
एवढ्या लवकर?
आईला वि4लं? 10:35
10:36
झाला? 10:36
हो. + पण... 10:38
मला नाही बोलावलं....! 10:43
Type a message

विद्वत्प्रमाणित त्रैमासिक (Refereed Journal)

मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष ३८, अंक १, हिवाळा २०२०, जानेवारी-मार्च २०२०

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



मराठी अभ्यास परिषद

**डॉ. सरोजा भाटे - पाणिनीय व्याकरणाचा मराठी व्याकरणावरील प्रभाव - दि. १९ ऑक्टोबर, २०१९ , स्थान - फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे**



सरोजा भाटे



- अध्यक्ष -
सलील वाघ



उपस्थित मान्यवर

# परिषद वार्ता

मराठी अभ्यास परिषदेच्या वतीने, दि. १९ ऑक्टोबर, २०१९ रोजी, डॉ. सरोजा भाटे (निवृत्त विभागप्रमुख, संस्कृत व प्राकृत भाषा विभाग, पुणे विद्यापीठ व प्रमुख विश्वस्त, पाणिनी प्रतिष्ठान, पुणे) ह्यांचे पाणिनीय व्याकरणाचा मराठी व्याकरणावरील प्रभाव या विषयावर व्याख्यान आयोजित करण्यात आले होते. आपल्या अभ्यासपूर्ण व्याख्यानात भाटे बाईंनी कॅरीपासून खंडेराव कुलकर्णी यांच्यापर्यंतच्या सर्व व्याकरणांचा धावता आढावा घेतला. मराठी व्याकरणात; अमराठी लेखकांचा (कॅरी) पहिला, मराठी भाषाभ्यासकांचा (दादोबा) दुसरा आणि आधुनिक भाषावैज्ञानिकांचा तिसरा, असे तीन संप्रदाय अस्तित्वात असल्याचे सोदाहरण दर्शवले. त्यांच्या मते पाणिनीय व्याकरणानुसार राजवाडे वगैरे मंडळींनी मराठीच्या व्याकरणाचा आराखडा तयार करायचा प्रयत्न केला, पण मराठी भाषेची सर्व वैशिष्ट्ये विचारात घेतली गेली नसल्याने ह्या व्याकरणात काही उणिवा राहून गेल्या. इंग्रज अधिकाऱ्यांनी आपल्या व्याकरणात इंग्रजीचा आधार घेतल्याने त्यातही बऱ्याच चुका राहून गेल्या आहेत. मोरो केशव दामल्यांचे व्याकरण इंग्रजी आणि मराठी या दोन्ही भाषांच्या प्रभावातून रचले गेले आहे. कृष्ण श्री. अर्जुनवाडकर ह्यांनी मराठीच्या १०८ व्याकरणांचा अभ्यास केला असल्याचे दिसून येते, हेदेखील त्यांनी लक्षात आणून दिले.

**मराठी अभ्यास परिषद पत्रिका**
विद्वत्प्रमाणित नियतकालिक (Refereed Journal)
ISSN : 2231-4059 । RNI No. 40048

भाषा आणि जीवन

संपादक : आनन्द काटीकर । कार्यकारी संपादक : विजय पाध्ये
संपादक समिती : सलील वाघ, वैशाली कार्लेकर, रमेश पानसे, कलिका मेहता
**संपादकीय व व्यवस्थापकीय पत्रव्यवहारासाठी पत्ता** : आनन्द काटीकर (संपादक, प्रकाशक व मुद्रक),
B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051. संपर्क क्र० 94216 10704.
ई-पत्ता: marathi.abhyas.parishad@gmail.com
**मुद्रणस्थळ** : विनायक एन्टरप्रायझेस, 517 कसबा पेठ, पुणे 411 011

**सूचना : १.** पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या कोणत्याही लेखाशी, लेखकाच्या मतांशी संपादक किंवा मराठी अभ्यास परिषद सहमत असेलच, असे नाही. **२.** ह्या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाकडून अनुदान मिळाले आहे. तथापि या अंकात प्रसिद्ध झालेल्या कोणत्याही लेखाशी. लेखकाच्या मतांशी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ व महाराष्ट्र शासन सहमत असेलच, असे नाही.

| वर्गणीचे दर | व्यक्ती | संस्था |
|---|---|---|
| वार्षिक | ₹१५०/- | ₹२००/- |
| त्रैवार्षिक | ₹४००/- | ₹५५०/- |
| पंचवार्षिक | ₹७००/- | ₹९००/- |
| आजीव | ₹५०००/- | (नाही) |

**किरकोळ अंकाची किंमत ₹४०/-**

**वर्गणीची रक्कम थेट बँक खात्यात भरता येते.** बँक खात्याचा तपशील पुढीलप्रमाणे - खातेधारक नाव : मराठी अभ्यास परिषद. बँकेचे नाव : बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रोड शाखा, पुणे. खाते क्रमांक: 2005 716 4260 । IFSC: MAHB0000041 रकमेची पावती व नियतकालिकाचे अंक पाठवण्यासाठी, रक्कम बँक खात्यात जमा केल्यावर लगेच वर्गणीदाराचे नाव व पत्ता आणि भरणा केलेल्या रकमेचे तपशील 94203 22982, 94216 10704 वा 98819 00989 ह्यांपैकी कोणत्याही क्रमांकावर SMS अथवा व्हॉट्सॲपद्वारे कळवणे आवश्यक.

## अनुक्रमणिका

*संपादकीय*

# चित्रलिपीच्या दिशेने?

**आनन्द काटीकर**

**मा**णूस बोलायला लागला ही त्याच्या इतिहासातील एक महत्त्वाची घटना आहे. माणसाच्या पृथ्वीवरील अस्तित्वानंतर हजारो वर्षांनी माणूस बोलायला लागला. त्यासाठी त्याला झाडावरून खाली जमिनीवर उतरावे लागले. त्यांच्या हालचालीत, आहारात त्यामुळे शरीरात बदल होऊ लागले. मेंदूच्या रचनेवरही काही परिणाम होत गेला आणि साधारण दहा हजार वर्षांपूर्वी माणूस बोलायला लागला असावा. मग कालौघात समूहजीवन स्थिरावले आणि केवळ बोलणे पुरेसे नाही तर हे बोललेले लिहिता येऊ शकते यांचा शोध त्याला लागला आणि माणसाच्या जीवनात अक्षरक्षः क्रांती झाली. भाषेच्या बोलणे आणि लिहिणे या दोन्ही अंगांच्या वाढीमुळे माणसाच्या प्रगतीचा वेलू झपाट्याने गगनावेरी गेला. प्रारंभी मनुष्य आपले विचार साध्या उभ्या-आडव्या रेघोट्या काढून व्यक्त करीत असे. रेघोट्या मारता मारताच चित्रे काढण्याइतकी त्याची प्रगती झाली. त्या चित्रांतून तो आपला आशय व्यक्त करू लागला. सूर्य, वृक्ष, साप, बकरी इ० चित्रांनी त्या त्या वस्तूंचा व प्राण्यांचा बोध होऊ लागला. प्राचीन गुहानिवासी माणसांनी कोरलेली चित्रे आज ठिकठिकाणी सापडली आहेत.

फ्रान्समधील मॉन्टिगॅक नावाच्या एका छोट्या गावातील लॅसलॉक्स नावाच्या प्रसिद्ध गुहेतील चित्रे ही रोमन लिपीची आद्यरूप असावीत, असे मानले जाते. इजिप्त व मेसापोटेमिया या देशांत अभिव्यक्ती चित्रांच्याद्वारेच होत असे. पण इजिप्तमध्ये ही चित्रे प्रायः दगडांवर खोदीत आणि मेसापोटेमियात (क्युनिफॉर्म लिपीदेखील) ती मातीच्या विटांवर खिळ्यांनी कोरीत. विटांचा पृष्ठभाग मऊ असल्याने त्यांवर केवळ रेघाच ओढता येत, गोलाकार काढता येत नसत. उदा० तीनचार रेघा ओढून विटांवर माशाचे चित्र काढीत. त्यामुळे आरंभापासूनच ही चित्रे संकेतात्मक झाली. याच संकेतात्मक चित्रांतून पुढे इराणी लोकांनी अक्षरे बनविली. चित्रलिपी हा लिपीच्या विकासातील एक टप्पा होय.

मध्य-प्रदेशातील भीमबेटका हे भारतातील सर्वात प्राचीन ठिकाणदेखील अशा गुहा-चित्रांमुळेच जागतिक वारसा स्थान ठरले आहे. तेथील पाषाणयुगीन गुहेतील चित्रकारी इसवी सनपूर्व ३०,००० वर्षांपूर्वीची असल्याचे मानले जाते. भीमबेटकाच्या सभोवताली असणाऱ्या सुमारे पाचशे शैलगृहांमध्ये अशी प्रागैतिहासिक भित्तिचित्रे असली तरी तेथे जायला रस्ते नाहीत. भीमबेटकामध्ये विविध प्राणी, पक्षी, झाडे, शिकारीची दृश्ये अशी आदिमानवाने त्याच्या आयुष्यात आलेल्या प्रसंगांची नैसर्गिक रंगातली चित्रे काढलेली दिसतात. अशा चित्रांच्या आधारे भावना व्यक्त करता येतात आणि त्या टिकवता येतात, हे लक्षात आल्यावर माणसाला लिपीचा शोध लागला असावा.





अनुक्रमणिका

लिपी ही लिखाणाची सूत्रबद्ध पद्धत आहे. लिपीमध्ये प्रामुख्याने अक्षरे व अंकांचा वापर केला जातो. लिपीचा उपयोग माहितीसंचयासाठी आणि संदेशांची देवाणघेवाण करण्यासाठी होतो. वर्ण किंवा ध्वनी यांचे लेखन करण्यासाठी ज्या चिन्हांचा उपयोग करतात, त्या चिन्हसमूहाला लिपी असे नाव आहे. एका चिन्हापासून जेव्हा एकाच ध्वनीचा बोध होतो, तेव्हा लिपीचा उद्देश सफल होतो. आजची लिपी ही मानव बोलायला शिकल्यापासून हळूहळू परिणत झाली आहे.

वैदिक लोकांनी गणन व लेखन या दोन्ही बाबतीत बरीच प्रगती केली होती. भारतात प्रारंभी ब्राह्मी-लिपीचा उपयोग केला जात होता. तिचा निश्चित उगमकाळ सांगता येत नसला तरी ती इसवीसनपूर्व पाचव्या शतकात प्रचारात होती, एवढे निश्चित म्हणता येते. पाणिनीच्या अष्टाध्यायीत (इ.स.पू. ४००) देखील लिपीचा उल्लेख येतो. अंदाजे ५००० वर्षांपूर्वी आपला पूर्वज रीतसर लिहायला लागला असावा आणि पाणिनीच्या काळापर्यंत हळूहळू त्या लेखनाला स्थैर्यही प्राप्त झाले असावे.

आज लिपीच्या अस्तित्वाला ५००० वर्षे पूर्ण झाल्यानंतर काय दिसते? जगातील सुमारे ७००० भाषांसाठी हजारो लिप्या अस्तित्वात आहेत. काही लिप्या पूर्ण स्वतंत्र, काही लिप्या पूर्ण भिन्न तर काहींमध्ये थोडेफार साम्यभेद दिसतात. डावीकडून उजवीकडे, उजवीकडून डावीकडे लिहिल्या जाणाऱ्या लिप्या तर आहेतच पण त्याचबरोबर वरून खाली जाणाऱ्या लिप्याही अस्तित्वात आहेत. सांकेतिक चिन्हांच्या लिप्या जशा आहेत तशाच चित्रांच्या लिप्याही आहेत. संगणकीय प्रगतीमुळे आणि विविध गरजांमुळे आपल्या सांकेतिक चिन्हांच्या लिप्यांमध्ये काही चित्रे अपरिहार्यपणे शिरली आहेत. ज्यांना इमोजी म्हणजेच भावचिन्हे म्हटले जाते. ही भावचिन्हे कमीतकमी जागा व्यापून अधिकाधिक अर्थ व्यक्त करणारी असल्याने त्यांच्या आधारे आधुनिक संदेशन मोठ्या प्रमाणावर होऊ लागले आहे. वेगळ्या शब्दांत सांगायचे तर अनेक चित्रे आता आपल्या लिपीत शिरू लागली आहेत. आणि त्यांच्या परिणामकारकतेमुळे त्यांचा वापरही वाढायला लागला आहे. नवनव्या भाव-भावना व्यक्त करण्यासाठी नवनवी चित्रे-चिन्हे येऊ लागली आहेत.

या भावचिन्हांच्या वाढत्या प्रभावामुळे व्हॉट्सॲप, ट्विटर, टेलिग्राम, फेसबुकसारख्या समाजमाध्यमांत तर त्यांनी हातपाय पसरले आहेतच पण त्याचबरोबर वर्ड, एक्सेल यांसारख्या सारख्या औपचारिक लेखनातही त्यांचा वावर होऊ लागला आहे. परिणामी लेखक किंवा वाचकही (आणि त्यामुळे चित्रकारही) आपले म्हणणे अजून प्रभावी होण्यासाठी नवनवी भावचिन्हे तयार करता येतील का, याचा विचार करत आहेत. जशा म्हणी किंवा वाक्प्रचार 'घागर में सागर' या न्यायाने कमीतकमी शब्दांत भाषेचे सौंदर्य वाढवतात, त्याचप्रमाणे एखादेच भावचिन्हदेखील लिहिणाऱ्याच्या मनातील भावना अधिक चांगल्या क्षमतेने पोहोचवू शकते. साधे हसण्याचे उदाहरण घेऊ या – स्मित, मंद हास्य, सुहास्य, खळखळून हास्य आणि सात मजली हास्य अशा जास्तीतजास्त पाच (किंवा अजून काही शब्द घडवून ६-७-८) प्रकारे आपण

हास्याचे वर्णन करू शकतो. मात्र आज आपल्या चलभाषांत हास्याचे सुमारे २४ तर रडण्याचे अंदाजे १४ प्रकार (ही संख्या वाढलेली असू शकते) उपलब्ध आहेत. म्हणजे आपल्या भावना पोहोचवण्यासाठी जिथे केवळ लिपीच नव्हे तर भाषादेखील कमी पडते आहे, तिथे ही भावचिन्हे आपल्या मदतीला आली आहेत.

पण ही भावचिन्हे आपल्या लिपीत सामावण्याचा प्रवास साधा-सोपा नाही. युनिकोड कन्सोर्शियम या संस्थेकडे तसा प्रस्ताव पाठवावा लागतो. त्या प्रस्तावासाठी; या प्रकारच्या भावचिन्हाचा वापर पूर्वी त्या विशिष्ट भाषकांनी केलेला आहे, याचीही उदाहरणे द्यावी लागतात. हे भावचिन्ह अमूक प्रकारचेच का असावे, हे देखील सर्व पूरक माहितीसह पटवून द्यावे लागते. या भावचिन्हाला त्या विशिष्ट भाषेच्या जगतातून प्रचंड मागणी आहे, हे सिद्ध करावे लागते. त्यासाठी गूगल, याहू, बिंग इत्यादी शोधयंत्रांवर लोकांनी शोध घेतल्याचे पुरावे सादर करावे लागतात. पुन्हा हे पुरावे फक्त चार-पाच ठिकाणांचे असून चालत नाही. या भावचिन्हाची मागणी सर्वत्र आहे, हे सिद्ध व्हावे लागते. त्यानंतर युनिकोड कन्सोर्शियमला प्रस्ताव पाठवला की त्या प्रस्तावावर चर्चा होते, पुराव्यांची छाननी होते, ह्या पुराव्यांचा योग्य तो विचार करून मग त्या भावचिन्हाला संगणकीय लेखनात किंवा आभासी लेखनात स्थान मिळते. अर्थात आपण अशा किती भावचिन्हांना सामावून घ्यायचे, असा प्रश्नही निर्माण झालेला आहे आणि त्यामुळे युनिकोड कन्सोर्शियममध्ये काही वादही झडले आहेत-झडत आहेत. थोडक्यात 'आले एखाद्याच्या मना' म्हणून भावचिन्ह प्रत्यक्षात येत नाही तर त्या विशिष्ट भाषक समाजाला आपल्या भावना त्यातून व्यक्त होत आहेत, असे प्रकर्षाने वाटते आहे ना, याचा विचार केला जातो. मात्र हा सर्व समाज म्हणजे पुन्हा संगणकीय किंवा ई-व्यवहारात सक्रिय सहभागी असणारा समाजच होय.

या भावचिन्हांच्या वाढीमुळे आपली लिपी शिकवायची म्हणजे स्वर, स्वरादी आणि व्यंजने इतकीच शिकवायची? का आता भावचिन्हे आणि त्यांचे अर्थ पण शिकवायचे असा प्रश्न अजून १५-२० वर्षांत भाषातज्ज्ञांसमोर निर्माण होणार आहे. म्हणजे आपली लिपी ध्वनिचिन्हे आणि चित्रे यांच्या संयोगाची चित्रलिपी होऊ पाहते आहे. अर्थात, चिनी-जपानी भाषक चित्रलिपीतून बाहेर पडण्याचा काहीसा प्रयत्न करत आहेत आणि सारे जग चित्रांना आपल्या लिपीत समाविष्ट करू इच्छित आहे, असा विरोधाभास तयार झालेला दिसतो. त्यातच या भावचिन्हांच्या अर्थाविषयी पण मतभेद आहेत. आपल्या मराठीतला ठेंगा 👍 आता 'लै भारी' झाला आहे. अशी अनेक चिन्हे वेगवेगळ्या सांस्कृतिक वातावरणातून वैश्विक होऊ पाहणार आहेत आणि त्यांचे अर्थ त्या त्या भाषकांनी कसे लावायचे याचेही भान त्या त्या समाजाला राखावे लागणार आहे. त्याचप्रमाणे विनाकारण भावचिन्हे वापरली जात नाहीत ना, याचाही विवेक करावा लागणार आहे. असा सारासार विचार न केला गेल्यास; ज्याप्रमाणे बालवाडीतल्या मुलांना चित्रांच्या आधारे शब्दांची-अक्षरांची ओळख करून दिली जाते, तसा एक तक्ता म्हणजे, काय सांगावे! भविष्यातील मराठीचा असा एखादा संपादकीय लेखही असू शकेल! ■

# भावचिन्हांना भलताच भाव

**वैशाली कार्लेकर**

**का**य म्हणता! कसली भावचिन्हं आणि कसला भाव? अहो! भावचिन्हं म्हणजे, तुम्ही आम्ही दिवसरात्र फेकत असलेले अंगठे. हसरे- रडवे चेहरे. फुलं. बदामी हृदये. फुलपाखरू. मोर आणि सूर्य, चंद्र. तारे काय म्हणाल ते! थोडक्यात आधुनिक भाषेत 'इमोजी'. जिकडे पाहावे तिकडे ही चिन्हे सध्या जो जोरदार 'भाव' व्यक्त करत आहेत. त्यामुळे त्यांचा आणि वापरणाऱ्यांचा 'भाव' भलताच वाढला आहे. हनुवटीवर बोट ठेवून बुचकळ्यात पडलेल्या भावचिन्हासारखा काय चेहरा करता? जर तुम्हाला व्हॉट्सअप आणि फेसबुकवरच्या संदेशा-संदेशीत योग्यप्रकारे भावचिन्हं वापरता आली नाहीत किंवा दुसऱ्यांनी वापरलेली चिन्हे समजून घेता आली नाहीत तर या जगात तुमचा 'भाव' उतरलाच म्हणून समजा. काही खरं नाही तुमचं!

खरंच आहे हे! जसं लेखनात विरामचिन्हं असल्याशिवाय अर्थबोध होत नाही तसं संदेशामध्ये भावचिन्हं असल्याशिवाय 'भावनाबोध' होणारच नाही, अशी आजच्या या तमाम संदेश लिहिणाऱ्यांची आणि वाचणाऱ्यांची धारणा आहे. हातच्या काकणाला... नव्हे... चलभाषाला आरसा कशाला? उघडा व्हॉट्सअप आणि बघा नीट. प्रत्येक संदेशात वाक्यागणिक अंगठे, टाळ्या, हसून किंवा रडून डोळ्यांतून पाणी काढणारे चेहरे. फुलांचा. गुच्छांचाही वर्षाव होताना दिसेल. वचने किं दरिद्रता? फुलं किंवा झाडं थोडीच खरी आणि घरी नेऊन द्यायची आहेत! लिहिणाऱ्याचं सोडा. वाचणाऱ्यालाही भावचिन्हांशिवाय एखादा 'कोरडा' संदेश आला तर चुकल्यासारखं वाटेल, अशी परिस्थिती आहे. तो पुन्हापुन्हा त्या संदेशाचा अर्थ नीट वाचून बघेल. एवढंच काय पण एखाद्या वाक्यावर. घटनेवर कोणते भावचिन्ह वापरून प्रतिक्रिया द्यावी हे न कळल्यामुळे 'कोणतं भावचिन्ह टाकू आता' असं आपल्यावरचं हे संकट उघडपणे 'शेअर' करणारेही काहीजण दिसतील.

काहीही म्हणा पण भावचिन्हांचा अर्थ हाही एका स्वतंत्र विषय आहे. त्यांची आपापल्या वर्तुळात एक परिभाषा जमून गेली आहे. आनंदी - दुःखी चेहरे किंवा टाळ्या, अंगठा अशा काही चिरपरिचित चिन्हांशिवाय इतर अनेक चिन्हांचा अर्थ जो तो आपापल्या समजुतीप्रमाणे लावून घेताना दिसतो. प्रतिक्रिया देण्यासाठी एखाद्याचा अंगठा सारखा पुढे येतो तर कुणीतरी नेहमी हसऱ्या चेहऱ्याने वावरत असते. कुणी सारख्या टाळ्या तर कुणी फुलं. जर का चुकून कुणी ही चिन्ह तयार करणाऱ्यांनी कोणत्या अर्थाने ही चिन्हे तयार केली आहेत हे पाहिले तर अगदी हसून मुरकुंडी वळेल आणि 'हसून डोळ्यांतून पाणी काढणाऱ्या' भावचिन्हासारखा आपला चेहरा होईल. उदा० डोळे झाकलेले माकड हे लाजण्याचं चिन्ह नसून 'बुरा मत देखो'वालं गांधीजींचं

माकड आहे. डोक्यावर गोल वर्तुळ असलेला चेहरा चक्रावला किंवा आश्चर्यात बुडालेला नसून तो आपण निरागस देवदूत असल्याचे सांगतो. हसऱ्या चेहऱ्यांचेही नाना प्रकारचे अर्थ आहेत, पण असो. आपण ज्यांना हे चिन्ह पाठवतो ते आपल्याला अपेक्षित अर्थ घेत आहेत, भावना पोहोचवत आहेत तोपर्यंत काहीच बिघडत नाही. पण अपरिचित व्यक्ती किंवा गट, कार्यालयीन व्यवहार या ठिकाणी अशा चिन्हांचा कुणी भलताच अर्थ घेऊ नये म्हणजे झालं.

एक चित्र हजार वाक्यांपेक्षा जास्त बोलकं असतं म्हणतात. अगदी त्याचप्रमाणे आज ही भावचिन्हं संदेशामध्ये भावना मिसळून आपल्या भावना जोरकसपणे इतरांपर्यंत पोहोचवत आहेत. नीरस होऊ शकणाऱ्या लेखी संवादामध्येही प्रत्यक्ष भेटीतील संवादाप्रमाणे चेहऱ्यावरचे हावभाव, शब्दांमधला चढउतार दाखवून जिवंतपणा आणत आहेत. लांबलचक वाक्यांनी जे सांगता येणार नाही ते एखाद्याच समर्पक भावचिन्हाने पोहोचवत आहेत. अगदी 'शब्देविण संवादु'. त्याचवेळी वेळप्रसंगी साजेसं 'खोटं' भावचिन्ह धाडून आपल्या खऱ्या भावना लपवायलाही मदत करत आहेत. पण जिथे चेहरेही मुखवटे घालतात तिथे भावचिन्हाने मुखवटा घालणं अगदीच क्षम्य.

इमोजी किंवा भावचिन्हांचा उगम जपानमध्ये १९९८मध्ये झाला असला तरी २०१०पासून त्यांचा वापर खऱ्या अर्थाने वाढत गेला. पुढे जगभरातून मुबलक वापर झाल्याने २०१५मध्ये 'हसून डोळ्यातून पाणी काढणाऱ्या' भावचिन्हाला ऑक्सफर्ड डिक्शनरीने 'वर्ड ऑफ द इयर' घोषित केले आणि भावचिन्हांची ताकद समोर आली आणि आता दिवसेंदिवस ती वाढतच चालली आहे. बदलता काळ, संस्कृती, वर्णभेद, स्त्रीपुरुष- समानता, कुटुंबव्यवस्था अशा अनेक मुद्द्यांची दाखल घेत ही चिन्ह कालानुरूप पालटत आहेत. भविष्यात कदाचित एखाद्या स्वतंत्र भावचिन्ह भाषेइतकीही ती परिपूर्ण होऊ शकतील अशी चिन्हं दिसत आहेत. असणारच!

कारण आज २०२०मध्ये भावचिन्हावाचून तर बोटही हलत नाही कुणाचं! पटलं ना!

■



# काठोकाठ भरू द्या प्याला...भरपूर वापरा इमोजी

देविदास देशपांडे

इमोजींच्या अतिक्रमणामुळे लिखित भाषा समाप्त होईल, अशी भीती काही वर्षांपूर्वी अनेक भाषाशास्त्रज्ञांना वाटत होती; पण इंग्रजीच्या तुलनेत 'इमोजी'भाषकांची म्हणजे लेखकांची संख्या तिप्पट आहे. त्यामुळे इमोजीच्या निमित्ताने तरी लोक लिहिते होतील आणि आपल्या भाषेला नवसाज चढवतील.

जगातील प्राचीन भाषांपैकी एक असलेली चिनी भाषा ही ध्वन्याधारित भाषा आहे. म्हणजेच आवाजातील चढ-उतारानुसार शब्दांचे अर्थ बदलतात. परंतु चिनी लिपी ही चित्रात्मक लिपी आहे. त्यामुळेच चीनमधील एका प्रांतातील लोकांना दुसऱ्या प्रांतातील लोकांचे बोलणे समजत नसले, तरी त्यांनी लिहिलेले सगळे समजते. आपल्याकडील देवनागरी लिपीमुळे हिंदी-मराठी जशा एकरूप दिसतात, पण वेगळ्या राहतात, तसाच प्रकार तिकडे आहे. त्यामुळेच भाषाशास्त्रज्ञ चिनी भाषा एक न मानता भाषाकुल मानतात; मात्र केवळ लिखाणाची पद्धत एकसारखी असल्याने तिला एक भाषा म्हणून ग्राह्य धरण्यात येते. सुमारे २३०० मुळाक्षरे असलेली चिनी लिपी ही जगातील सर्वांत अवघड लिप्यांपैकी एक आहे. तिच्या खालोखाल १८०० मुळाक्षरे असणारी जपानी भाषा आहे.

चिनी लिपी एवढी अवघड असल्यामुळेच की काय, माओ झेडाँगने १९३६मध्ये म्हटले होते, की देशात जनसामान्यांचा सामाजिक संस्कृतीत सहभाग वाढवायचा असेल, तर चिनी अक्षरे मुळातूनच बाद करायला हवीत; मात्र याच माओने १९४८मध्ये सत्तेवर आल्यानंतर सुलभ चिनी लिपी आणली व आजही देशात हीच सिम्प्लिफाइड चायनीज वापरली जाते.

वास्तविक जगातील सगळ्या लिप्या एकप्रकारे चित्रेच आहेत. एके काळी माणसे गुहेमध्ये राहत असत. त्याच गुहेच्या भिंतींवर त्यांनी चित्रे रेखाटली. त्याच चित्रांचे संकेत तयार झाले आणि त्यातूनच लिप्या तयार झाल्या. कालौघात, चित्रे रेखाटण्याऐवजी अक्षर काढण्याला प्राधान्य देण्यात आले. गुहेत चित्र काढण्यासाठी वापरलेल्या कोळशाच्या जागी लेखण्या आल्या. आज त्याच लेखण्यांची जागा स्मार्टफोनने घेतली आहे. अन् याच अत्याधुनिक स्मार्टफोनवरून आपल्या आदिम प्रेरणेकडे माणसाचा प्रवास सुरू झाला आहे. मनातील भाव चित्रांनी व्यक्त करण्याची प्रवृत्ती!

आदिमानवाच्या अवतीभवती हत्ती, मगर व वाघ असे प्राणी होते. साहजिकच गुहांच्या भिंतींवर त्यांनीच जागा पटकावली. आजचा भवताल मेट्रो ट्रेन, विमान आणि आइस्क्रीमने भरलेला आहे. मग आजच्या इमोजींमध्ये या वस्तूंनी जागा पटकावली तर त्यात काय नवल?





अनुक्रमणिका

आदिमानवाच्या दृष्टीने शिकार आणि भक्ष्य हाच दिनक्रम होता. आज मानवी भावभावनांमध्ये राग, लोभ, अप्पलपोटेपणा, निराशा, अत्यानंद अशा कितीतरी छटा पसरलेल्या आहेत. अगदी एकभाषक समाजातही या भावना शब्दांमध्ये स्पष्ट व्यक्त करणे तसे अवघडच, मग अन्य भाषकांपुढे होणाऱ्या फजितीची काय कथा? अशा वेळेस चित्रासारखा कामाला येणारा मित्र नाही.

या चित्रात्मक लिपीची आज आठवण होण्याचे कारण म्हणजे भाषाशास्त्रज्ञांनी केलेले नवीन संशोधन. शब्दांच्या लिखाणामध्ये फेरफार करून किंवा भर घालून नवीन शब्द तयार करणे, तसेच विरामचिन्हांचा उपयोग केल्याने संदेश अधिक भावनिक होतात, असे अमेरिकेतील संशोधनातून पुढे आले आहे. व्यवहारातील बोलीभाषांप्रमाणेच 'टेक्स्ट एसएमएस' हे लिखित संदेशांमध्ये भावना प्रभावी पद्धतीने अभिव्यक्त करतात, असे संशोधकांनी म्हटले आहे. उलट 'टेक्स्ट एसएमएस'मुळे लिखित भाषा इतक्यातच नाहीशी होण्याची सुतराम शक्यता नाही, असे संशोधकांनी म्हटले आहे. (यामध्ये व्हॉट्सॲप संदेशांचाही समावेश होतो).

हे संशोधन करणाऱ्या अमेरिकेतील बिंगहॅम्टन युनिव्हर्सिटीच्या प्रोफेसर सेलिया क्लिन यांच्या मते, 'प्रत्यक्ष बोलताना लोक शब्दांतील चढ-उतार, विराम असे भाषाबाह्य संकेत व्यक्त करतात; मात्र लिहिताना हे संकेत, तसेच चेहऱ्यावरील भावना आणि हातवारे व्यक्त करता येत नाहीत. ते काम इमोजी करतात.' इमोटिकॉन्स (इमोजी), शब्दांचे लिखाण बदलणे आणि विरामचिन्हांच्या अनियमित वापरातून (उदा० !!!) आपल्या शब्दांना अतिरिक्त अर्थपूर्ण पद्धतीने व्यक्त करता येऊ शकते, असे भाषाशास्त्रात मानले जात होते. इमोजी हे त्याचेच प्रत्यक्ष रूप आहे. 'कम्प्युटर्स इन ह्यूमन बिहेव्हियर' या नियतकालिकात हे संशोधन प्रसिद्ध झाले आहे. या प्रकारे भावना व्यक्त करण्याला अभ्यासकांनी नावही दिलेले आहे - टेक्स्टिझम. क्लिन यांच्या नेतृत्वाखाली झालेल्या या संशोधनाचा निष्कर्ष असा आहे, की केवळ पूर्णविराम दिलेले लघुसंदेश हे कमी प्रामाणिक मानले जातात.

'इलेक्ट्रॉनिक संपर्कव्यवस्थेमुळे नवीन भाषिक रचना विकसित होत आहेत. लोकांना अभिव्यक्त होण्यासाठी उपलब्ध असलेली साधने आणि त्यांना जे व्यक्त करायचे आहे ते, यांतील दरी त्या रचना भरून काढत आहेत,' असे क्लिन म्हणतात.

अन्य एका संशोधनात दिसून आले होते, की जगात ३.२ अब्ज लोकांकडे इंटरनेटची जोडणी आहे आणि त्यातील ९२ टक्क्यांपेक्षा जास्त लोक नियमितपणे इमोजींचा वापर करतात. याची तुलना आपण जगाची भाषा समजल्या जाणाऱ्या इंग्रजीशी करू. जगातील ३४ कोटी लोकांनी स्वतःची मातृभाषा म्हणून इंग्रजीचा निर्देश केला आहे, तर ६० कोटी लोक दुसरी भाषा म्हणून इंग्रजी वापरतात (आपल्या भारतीयांसारखे)! म्हणजेच सुमारे एक अब्ज लोकांना इंग्रजी येते (कितपत हा प्रश्न अलाहिदा). म्हणजेच इंग्रजीच्या तुलनेत इमोजीभाषकांची संख्या तिप्पट आहे.





अनुक्रमणिका

म्हणूनच की काय, २०१५ साली ऑक्सफर्ड डिक्शनरीने इमोजीला (आनंदाश्रू असलेला चेहरा) 'वर्षाचा शब्द' म्हणून मान दिला होता! दिवसेंदिवस अधिक जवळ येत चाललेल्या जगाच्या दृष्टीने इमोजी ही खऱ्या अर्थाने आंतरराष्ट्रीय भाषा म्हणून कामास येऊ शकते. ब्रिटिश भाषाशास्त्रज्ञ व्हिव्हियन इव्हान्स यांनी 'दी इमोजी कोड – द लिंग्विस्टिक बिहाइंड स्माइली फेसेस अँड स्केअर्डी कॅट्स' नावाचे पुस्तक लिहिले आहे. त्यात त्यांनी इमोजीचे वर्णन 'जगाच्या संपर्काचे जागतिक स्वरूप' असे केले आहे.

इमोजी म्हणजेच चित्रे. आज एसएमएस असो वा व्हॉट्सॲप, फेसबुक असो वा ट्विटर... इमोजी नाही असा संदेश क्वचितच एखादा असेल. या छोट्या छोट्या चिन्हांनी सर्व जागा व्यापल्या आहेत. बहुतेक स्मार्टफोनमध्ये ७२०पेक्षा अधिक स्माइली उपलब्ध असतात. या इमोजींच्या अतिक्रमणामुळे लिखित भाषा समाप्त होईल, अशी भीती काही वर्षांपूर्वी अनेक भाषाशास्त्रज्ञांना वाटत होती. वर्ष २०००नंतर जन्मलेल्या डिजिटल युगातील लोक लिखित पद्धतीने अभिव्यक्ती करण्यात आळशी आहेत, असे त्यांचे मत होते. किंबहुना इमोजींकडे पूर्वी याच पद्धतीने पाहिले जायचे; मात्र आता या नव्या संशोधनामुळे तो जुना दृष्टिकोन बदलायला हरकत नसावी. अनेक जुन्या अभिव्यक्ती या नव्या भाषेत नव्या ढंगात पुढे येतील.

*काठोकाठ भरू द्या प्याला, फेस भराभर उसळू द्या*
*प्राशन करता रंग जगाचे, क्षणोक्षणी ते बदलू द्या*

असे केशवसुतांनी म्हटले, तेव्हा बदलत्या जगाची चुणूकच त्यांनी दाखवली होती. आज ते पूर्ण वाक्य एका इमोजीत बसू शकते. चहापासून दारूपर्यंतचे इमोजी आपल्याला डिजिटल जगाचे रंग दाखवत आहेतच. त्यांचा भरपूर वापर करू द्या. त्या निमित्ताने तरी लोक लिहिते होतील आणि आपल्या भाषेला नवसाज चढवतील.

■

**शबनम**

दवबिंदूसाठी एक शब्द आहे शबनम. आपल्याकडे कविजनांनी 'शबनम बॅग' वापरण्याची फॅशन आणली. त्या पिशवीला शबनम बॅग का म्हणतात? तर तिच्यावर शबनमसारखे म्हणजे दवबिंदूसारखे चमचमणारे छोटे आरसे लावलेले असतात!

(बोरकरांनी दवबिंदूंना 'अभिलाषांच्या ज्योती' म्हटलं आहे.)

मराठवाड्यात मात्र दवबिंदूंना म्हणतात 'वदाड'. काय वदाड पडलंय! पण प्रमाण मराठी भाषेत म्हणतात दहिवर.

*- विश्वास वसेकर*

# गृहनिर्माणातील पागडी संस्कृती

नितीन अनंत साळुंखे

**पा**गडी हा शब्द घरासंदर्भात वापरला जातो. मुंबईकरांच्या अत्यंत जिव्हाळ्याचा असलेला हा शब्द, हल्लीच्या पुनर्विकास आणि त्यातून मिळणाऱ्या ओनरशिपच्या घरांच्या काळात हळुहळू विस्मृतीत जाऊ लागलाय. पण एकेकाळी मुंबईत कुठेही घर घ्यायचे असलं, की ते पागडीनेच मिळायचं. आजची वैभवशाली मुंबई घडवलीय, ती अशाच पागडीच्या घरात राहून कष्ट करणाऱ्या मुंबईकरांनी. या अर्थाने 'पागडी' या शब्दाशिवाय मुंबईचा इतिहास पूर्ण होऊच शकत नाही.

'पागडी'ची घरं म्हणजे सोप्या शब्दांत सांगायचं तर भाड्याने घेतलेलं घर. घरमालक किंवा चाळमालक कुणीतरी एक असायचा व तो गरजूंना त्याच्या मालकीच्या जागेवरची किंवा चाळीतली घरं भाड्याने द्यायचा. मालक कायम असायचा, भाडेकरू बदलत असायचे. तेंव्हा मालकीची घरं ही संकल्पना नसायची, कारण त्या काळात मुंबईत माणसं यायची, ती फक्त रोजगारापुरती. तीही बहुतेक सर्व एकटी. कुटुंबं गावाकडेच असायची. दिवसभर गिरणीत नाहीतर गोदीत राबायचं आणि रात्री पाठ टेकायला घरी यायचं. महिन्याचा पगार झाला, की आपल्या खर्चापुरते पैसे बाजूला काढून उर्वरित सर्व रक्कम कोकणातल्या किंवा घाटावरच्या गावातल्या आपल्या कुटुंबाकडे मनीऑर्डरने पाठवून द्यायची, हा बहुतेकांचा जीवनक्रम.

रिटायर झालं की आपल्या गावी परत जायचं, आपण काही मुंबईचे कायमचे रहिवासी नव्हेत, या उद्देशाने त्याकाळचे बहुतेकजण मुंबईत नोकरी करत असल्याने, त्यांना मुंबईत स्वत:च्या मालकीचं घरं नको असायचं आणि त्यामुळेच पागडीच्या घरात राहायचं, अशी सर्व व्यवस्था असे. सरकारी अर्जावरही याच उद्देशाने 'सध्याचा पत्ता' आणि 'कायमचा पत्ता' असे दोन स्वतंत्र रकाने पत्त्यांसाठी असत, ते याच मतलबाने. अजूनही हे रकाने असेच असलेले दिसतात. या सर्व नोकरदारांना चाकरमानी म्हणायचे. पण मुंबई हा असा एक पिंजरा आहे, की ज्यात एकदा आत शिरलेला माणूस बाहेर म्हणून काही पडू शकायचा नाही. आपल्याला काही या पिंजऱ्यातून बाहेर पडायला जमत नाही हे लक्षात आल्यावर, जमेल तसं आपलं कुटुंबही हळूहळू मुंबईत आणायचं आणि मुंबईत पागडीच्या घरात राहून कायमचं मुंबईकर व्हायचं, असा

जणू त्याकाळच्या लोकांचा शिरस्ताच झाला होता!

मीही असाच अंधेरीच्या एका बैठ्या चाळीतील पागडीच्या खोलीत राहायचो. वडील नोकरी करायचे व त्यांनी ही खोली पागडीने घेतलेली होती. 'पागडी' हा शब्द तेव्हापासूनच माझ्या कानावरुन गेला होता व मला त्याचं कुतूहलही वाटायचं. असंच एकदा मुंबईवरील जुनी पुस्तकं वाचताना, 'पागडी' हा शब्द कुठून आला असेल याचा मला एक धागा सापडला. माझ्या मनाने कौल दिला, की इथेच पागडी या शब्दाचा जन्म झाला. हा धागा सोळाव्या शतकात मुंबईत अस्तित्वात असलेल्या पोर्तुगीज सत्तेच्या व नंतरच्या ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीच्या चलनाकडे 'पागडी'चा जन्मदाता म्हणून बोट दाखवतो. 'पागडी' शब्द कसा अस्तित्वात आला असावा, हे समजण्यासाठी आपल्याला प्रथम पोर्तुगीज व नंतर ब्रिटीश भारतातील चलनाचा धावता आढावा घ्यावा लागणार आहे.

इसवी सन १५३०पासून पोर्तुगिजांचा अंमल मुंबईवर सुरू झाला होता. पण पोर्तुगिजांचं मुख्य ठाणं होतं वसई आणि मुंबई हा भाग त्याच्या दृष्टीने दुय्यम होता. तशी ही बेटं होतीही ओसाड. म्हणून मुंबईतल्या जमिनी पोर्तुगीज शासनकर्त्यांनी त्यांच्या देशातल्या बड्या लोकांना भाडेपट्ट्याने दिल्या होत्या. अशा लोकांतलाच एक होता मेस्टी डायगो (Meste Diago). काही ठिकाणी हे नाव Mestre Diago असंही नोंदवल्याचं दिसतं. त्यातील Mestre किंवा Meste हे इंग्रजी Misterसारखं संबोधन असावं आणि डायगो हे नाव असावं. ह्या डायगोला दिलेल्या जमिनीचं भाडं होतं वर्षाला १४३२.५ पारडो (Pardaos). पोर्तुगीज अमलाखाली असलेल्या पश्चिम किनाऱ्याच्या भागात १६व्या शतकात, Fedea-Fuddea, Tanga, Pardao इत्यादी नावाची नाणी वापरात होती. Fedea हे सर्वात लहान चलन. ह्याचाच मराठी अपभ्रंश पुढे 'फद्या' असा झाला. फद्या हा शब्द माझ्या वयाच्या लोकांनी लहानपणी कुठे न कुठे ऐकला असेल, त्याचा उगम अशा रीतीने पोर्तुगीज काळातील चलनात सापडतो. 'फद्या' हे पोर्तुगीज काळातील दुय्यम चलन असल्याने, एखाद्याच्या कमकुवतपणाची टिंगल करण्यासाठीदेखील हा शब्द वापरला जातो.

'Fedea'च्या थोडं वरच्या दर्जाचं चलन म्हणजे 'Tanga' किंवा 'Tanka'. ह्याचा मराठीतला उच्चार साधारण 'टांगा' किंवा 'टँगा' किंवा 'टंका' असा होतो. हाच शब्द पुढे अपभ्रंशित होऊन 'टका' किंवा 'टका' म्हणून रूढ झाला. (संजय पवारांचं एक नाटक होतं,

'कोण म्हणतो टका दिला' या नावाचं. त्यातला 'टका' बहुतेक हाच असावा. मराठीतला 'टक्का' किंवा 'टक्के' हा प्रतिशत या अर्थाचा शब्दही बहुतेक याच्याच पोटातून जन्मला असावा, कारण हे चलन पोर्तुगिजांच्या काही काळ अगोदर गुजरातेत प्रचलित होतं व याची किंमत साधारणतः नंतरच्या काळातल्या रुपयाचा एक भाग, म्हणजे १/१०० एवढी होती.). चार fedea म्हणजे एक tanka आणि पाच 'टका' म्हणजे पोर्तुगीज चलनातला एक 'पारडो' (Pardao) किंवा २० fedea म्हणजे एक pardao असंही म्हणता येईल.

मुंबई बेटांवरील पोर्तुगिजांची सत्ता १६६१ साली संपुष्टात येऊन, सन १६६५पासून ब्रिटीश ईस्ट इंडिया कंपनीची सत्ता मुंबई बेटांवर आली. तत्पूर्वी ईस्ट इंडिया कंपनीचं अस्तित्व दक्षिणेतल्या राज्यांमधे होतं आणि दक्षिणेत असलेल्या भारतीय राजसत्तांचं काही चलन ब्रिटीशही वापरत असत.

ईस्ट इंडिया कंपनीची मुंबईवर सत्ता आल्यावर काही पोर्तुगीज मुंबईत वास्तव्याला होते. त्यांना पोर्तुगीज राज्यकर्त्यांकडून लीजवर मिळालेल्या जमिनीही त्यांच्या ताब्यात होत्या. फक्त आता त्यांना ईस्ट इंडिया कंपनीला त्यांच्या चलनात भाडं द्यावं लागत असे. आणि त्यापैकी एक चलन होतं Pagoda. दक्षिणेतल्या मद्रास प्रांतातलं हे चलन, १७व्या शतकाच्या मध्यावर मुंबईतही अस्तित्वात होतं, असं अनुमान 'मुंबईचा वृत्तांत' ह्या पुस्तकातल्या माहितीवरून काढता येतं. पोर्तुगीज चलनातले साधारणतः ३.५ पारडो म्हणजे ब्रिटीश काळातील १ पॅगोडा, अशी याची किंमत होती. ज्या पोर्तुगिजांना, पोर्तुगीज मुंबईत 'पारडो'मधे जमिनीचं भाडं भरावं लागत होतं, त्या पोर्तुगिजांना आता ब्रिटीश मुंबईत 'पॅगोडा'मधे जमिनीचं भाडं भरावं लागत होतं. जमीन अमुक अमुक 'पॅगोडा' भाड्याने घेतली किंवा दिली, असं तेव्हा बोली भाषेत बोललं जात असणं शक्य आहे. पुढे पुढे कालौघात, 'भाड्याने' हा शब्द लयाला जाऊन, जमीन 'पॅगोडा'ने घेतली असं त्याचं रूपांतर झालं असावं. 'भाडे' या शब्दाला 'पॅगोडा' हा समानार्थी शब्द प्राप्त झाला असावा व पुढे तो 'पागडी' म्हणून स्थिर झाला असावा, असं अनुमान बांधलं तर चुकीचं ठरू नये, कारण 'पागडी' या शब्दाची समाधानकारक व्युत्पत्ती मला अद्याप कुठेही मिळालेली नाही. पुढे पोर्तुगीज गेले, ब्रिटीशही गेले, त्यांची जुनी चलनंही गेली, पण त्याकाळातल्या 'पॅगोडा'या चलनाचे अवशेष 'पागडी' या शब्दांच्या रूपात मागे उरले, असं माझं मत आहे. 'पागडी'ची जागा म्हणजे 'भाड्या'ची जागा हा त्या काळातला अर्थ आजही बदललेला नाही.

■

(पूर्वप्रसिद्धी : मुंबईतील ऐतिहासिक पाऊलखुणांचा मागोवा, लेखांक ३४. लेखकाची अनुदिनी)





अनुक्रमणिका

**संदर्भ**

१. चलनाच्या विनिमयाचा दर वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळा असतो. सबब, इथे दिलेला दर केवळ माहितीसाठी दिलेला आहे. त्या काळातली चलनं माहिती असावी व त्यांचा एकमेकांशी कसा संबंध होता, हे दाखवणे हा मर्यादित हेतू इथे आहे.

२. मलबारी फिरोज, Bombay in the Making (1661-1725).

३. शिंगणे मोरो विनायक, मुंबईचा वृत्तांत.

४. https://www.marathisrushti.com/articles/paagdi-sanskruti/

५. https://www.marathisrushti.com/articles/?p=58150

**अनुष्टुभ्**

आमचे घराणे जळगाव जामोद (जिल्हा बुलडाणा) येथील जहागीरदारांचे. जहागिरी गेल्या पण शान मात्र गेली नाही. त्यामुळे उत्पन्न आणि खर्च यांचा मेळ बसायचा नाही. त्या दिवशी सायंकाळी वडील अंगणात बसून महिनाअखेरची खर्चाची जुळवाजुळव करीत असता मध्येच पुटपुटले, 'काय करावं? सर्पणही अनुष्टुपात आलंय.' मला इतकंच कळलं की सर्पण संपत आलंय. पुढे मग अर्थ ध्यानात आला. महाकाव्ये रचताना प्रारंभी शार्दूलविक्रीडित, शिखरिणी, स्रग्धरा अशा भारदस्त वृत्तांचा वापर होतो. मग कवित्वशक्ती आटत येते. मग प्रत्येक चरणी अवघी आठ अक्षरे असलेल्या छोटेखानी अनुष्टुभ् वृत्तावर विसंबावे लागते. तेव्हा कमतरता येणे, संपत येणे या अर्थी अनुष्टुपात येणे ही शब्दयोजना आली असावी.

य०न० केळकर संपादित 'ऐतिहासिक पोवाडे किंवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास – भाग पहिला'मध्ये शाहीर सुलताना पाटील यांचा 'कंपूचा पोवाडा' छापला आहे. यात पाण्याचे दुर्भिक्ष्य वर्णिले आहे. त्यावर टीप देताना श्री० केळकर यांनी 'आत दारुगोळीचा अभाव आहे. मुख्य मीठ नाही. पाणीही अनुष्टुप आहे' हा संदर्भ दिला आहे. तेव्हा अनुष्टुप म्हणजेच संक्षिप्त वृत्त (शॉर्ट मीटर) यावरून अल्पता (शॉर्टेज) हा अर्थ निष्पन्न झाला असावा.

*- ब्रह्मानंद देशपांडे ('शब्दवेध' ग्रंथातील 'ब्राह्मणी भाषा' लेखातून)*

# केसरीनें प्रसृत केलेली परिभाषा

केसरीनें आतांपर्यंत प्रसृत केलेली निरनिराळ्या विषयांवरील परिभाषा या लेखांत संक्षेपतः देत आहें. गेल्या अर्धशतकांत केसरीनें अनेकविध चळवळींवर लेख लिहिले. त्या त्या ठिकाणीं, त्या त्या चळवळींचें स्पष्टीकरण करितांना महाराष्ट्रांतील सामान्य जनतेस समजेल अशा सोप्या भाषेंत आपलें लेखन करण्याची केसरीची नेहमींची रीत होती. त्यामुळें पुष्कळ वेळां त्याला नवीन शब्दसृष्टि निर्माण करावी लागली तर कांहीं ठिकाणीं पूर्वी प्रचारांत असलेल्या शब्दांना नवीन अर्थाचा पेहराव द्यावा लागला. कित्येक लेखकांनीं केसरीद्वारां पारिभाषिक शब्द पुढें आणून केसरीच्या कार्याला हातभार लावला. असल्या सर्व शब्दसंग्रहाची वर्गवारी करणें सोयीचें दिसल्यावरून, त्याची पुढीलप्रमाणें विल्हे लाविली – १) आर्थिक-औद्योगिक. २) कायदा-कायदेमंडळ. ३) धार्मिक. ४) भाषा. ५) मद्यपान. ६) मवाळ पक्ष व त्याचें राजकारण. ७) यांत्रिक. ८) यौद्धिक. ९) राष्ट्रीय पक्ष व त्याचें राजकारण. १०) राष्ट्रीय सभा. ११) व्यापार. १२) वृत्तपत्रीय. १३) शास्त्रीय. १४) शिक्षण. १५) शेती. १६) सरकार. १७) सामाजिक. १८) स्थानिक स्वराज्य, ग्रामसंस्था. १९) किरकोळ. २०) कोटीवाक्प्रचार-म्हणी. या वर्गांतील निवडून काढलेल्या शब्दांची एकंदर संख्या २८७० म्हणजे जवळ जवळ तीन हजार भरली. इतके शब्द व म्हणी वगैरे दिल्यास लेखाची मर्यादा ओलांडली जाईल म्हणून निवडक शब्द पुढे दिले आहेत. कांहीं ठिकाणीं शब्दांचें स्पष्टीकरण होण्यासाठीं ते ते शब्द ज्यांत आले आहेत अशीं केसरीनेंच लिहिलेलीं वाक्यें घेतलीं आहेत. सारांश, अशा निरनिराळ्या विषयांच्या परिभाषेचा त्रोटक संग्रह या लेखांत केला आहे. परंतु, लेखकाला ही जाणीव आहे कीं, हा संग्रह पूर्ण नाहीं, तें काम पुढें कोणींतरी करावें.

या संग्रहांत सर्वांत कमी (म्हणजे ५०) शब्द 'आर्थिक' विभागांत असून सर्वांत जास्त (म्हणजे ४८०) शब्द 'राष्ट्रीय पक्ष व त्याचें राजकारण' या विभागांत आहेत. असें होणें साहजिक आहे. कारण, देशांत राजकीय जागृति उत्पन्न करण्याचें ध्येय केसरीनें आपल्यापुढें ठेविलें आहे व तें तो अव्याहत पाळीत आला आहे.

या संग्रहाचे बहुशः चार प्रकार पडतात. पहिला – मूळच्या इंग्रजी शब्दास किंवा म्हणीस मुद्दाम बनविलेला मराठी शब्द किंवा म्हण; उदा. इंग्रजी 'ब्युरोक्रसी' या इंग्रजी शब्दासाठीं





अनुक्रमणिका

बनविलेला 'नोकरशाही' हा मराठी पारिभाषिक शब्द आणि 'गुड गव्हर्नमेंट इज नो सबस्टिट्यूट फॉर सेल्फ गव्हर्नमेंट' या इंग्रजी म्हणीची छायारूप 'स्वराज्याची तहान सुराज्यानें भागत नाहीं' ही मराठी म्हण. दुसरा – इंग्रजी शब्दांना आपल्या इकडे पूर्वी वापरण्यांत असलेला समानार्थक शब्द हुडकून ते देणें; उदा. 'रिप्रेशन' शब्दासाठीं 'सोटेबारगिरी' किंवा 'दडपशाही' हे शब्द वापरणें. तिसरा – पूर्वी प्रचारांत असलेल्या शब्दांना चालू परिस्थितींत उपयोगी पडेल असा निराळा अर्थरूपी पेहराव चढविणे; उदा. 'आगंतुक बहुमत', 'चातकवृत्ति' इत्यादि. चौथा – स्वतंत्रच शब्द बनविणें.

इंग्रजी शब्दांना जे मराठी पारिभाषिक शब्द दिले आहेत त्यांच्यापुढें मूळ इंग्रजी शब्द द्यावयास पाहिजेत, पण त्यामुळें लेखविस्तार होईल म्हणून ही रीत सर्वत्र अमलांत आणिली नाहीं.

**१) आर्थिक व औद्योगिक :** अर्थशास्त्र. अर्थशास्त्रसाधु (आपला स्वार्थ साधणारा अर्थशास्त्री); आर्थिक स्वातंत्र्य, आ. व्यवस्था; औद्योगिक स्वातंत्र्य, चलन, व्यापारी मंडळ, हुंडणावळ, कृत्रिम किंमत, श्रमसंयोग, संघशक्ति, स्वदेशी. गंगाजळी.

**२) कायदा व कायदेमंडळ :** अंदाजपत्रक, मागासलेला वर्ग, बहुसंख्याक वर्ग, मध्यम व कनिष्ठ वर्ग, पुढारलेला वर्ग, फडणीस, कायदेकानुमंडळ, आमदार, खासदार, मंत्री, लोकनियुक्त, जातवार, एकतंत्री, कायदा, प्रांतिक, दुतोंडी, प्रमाणपत्र, प्रतोद, हुकूम, सनद.

**३) धार्मिक :** व्याजोनारायण, मुद्दलनारायण (संन्यास घेऊन सावकारी करणारा), तत्त्वज्ञपुंगव, धर्महित, उपासक, उत्सव, उपाधि.

**४) भाषा :** भाषोत्कर्ष, भाषान्वय, उच्चारसंकर, आर्ष, भाषावृद्धि, मातृभाषा.

**५) मद्यपाननिषेध :** मद्य, पान, सुराग्रह, पहारा, निरोधन, रंभी, अबकारी.

**६) मवाळ पक्ष व राजकारण :** आर्जव, भैध्यवृत्ति, भिक्षांदेही, मंदगामी, सरकारजमा, होयबा पुढारी, नेमस्तपणा.

**७) यांत्रिक :** चित्रयंत्र (फोटो कॅमेरा), चलच्चित्र (सिनेमा)-पट, छायाचित्र (फोटो), तेलाड्या (जमिनींतील तेलाचे झरे शोधणारा), दूरदर्शक यंत्र, दूरध्वनिवाहक-यंत्र (टेलिफोन), ध्वनिप्रक्षेपक यंत्र (ब्रॉडकास्टिंग), पाणाड्या, बिनतारी तारायंत्र, बैठक (बेस), लोहमार्ग (रेल्वे), वाटाड्या (पायलट), वातोदक (सोडा वॉटर), सृष्टिगत शक्ति, शिल्पचितारी (ड्राफ्ट्समन),

धावता धोटा- (त्यांतील) बाण्याची किंवा आडवणीची कांडी, ताकदीचें सूत, (ताण्याच्या) गुंडाळ्या, कमान (स्प्रिंग), पांजणयंत्र.

**८) यौद्धिक :** अग्निजलवृष्टि, हुकमतीची जागा, आकाशयान-विद्या, आरमारी लढाई, कुलपी गोळा, खडी फौज, खंदकाची किंवा चराची चढाई, गणवेष (युनिफॉर्म), गरनाळ (हावित्झर), चिलखती गाडा-रणगाडा (टँक), गनिमी कावा, विषारी वायू-धूर, नाविक दळ, निरोप्या (डिस्पॅच रायडर), फुंकणी (केपाची बंदुक), बचावाचें धोरण, मनुष्यबल, महायुद्ध, युद्धमंत्री, लढाऊ जात, लष्करी भूत, शुश्रूषा पथक, तात्पुरता तह, सरकती सरहद्द, सरदार (सेनापती), फौजी किंवा जंगी (लाट) कमांडर इन चीफ, सर सेनापति, सैन्यभरती, स्वयंसैनिक.

**९) राष्ट्रीय पक्ष व राजकारण :** अखेर किंवा अंतिम फळ किंवा साध्य (गोल), अडवणूक-मार्ग, अंतर्व्यवस्था-मागणी, अप्रत्यक्ष प्रतिकार, अदृष्ट साधन (मॉरल फोर्स), असंतोष, अराजक, आत्ममहत्त्व (स्वाभिमान), उदारपक्ष, हुजूरपक्ष, एकमत, उदारमतवादी, एक व्यक्त पाऊल (ए डेफिनेट स्टेप), एतद्देशीय, एकमुखी-सत्ता, कमाल (मॅक्झिमम), किमान, कायदेशीर मार्ग, क्रांतिकारक चळवळ, जहाल, सणसणीत, ना मत ना कर, बेगडी सुधारणा, लोकशाही (डेमॉक्रसी), संघ (लीग), सनदशीर (कॉन्स्टिट्यूशनल), सार्वजनिक सभा, सामुदायिक शहाणपण.

**१०) राष्ट्रीय सभा :** अधिवेशन, अंतरराष्ट्रीय, अनत्याचारी, असहकारिता, असहकारवाद, अर्धे स्वातंत्र्य, असंदिग्ध मागणी, आगंतुक बहुमत, एकगठ्ठा, एकमुखी रुद्राक्ष (एकहाती सत्ता, एकमत), लोकशाही पक्ष (डेमोक्रॅटिक पार्टी), कार्यक्रमपत्रिका, कंठाळी ठराव, खुला अर्ज, खादी-चळवळ, गैरसनदशीर, गण (कोरम), गीतावाक्य (पालुपद), घटक (यूनिट), चर्चात्मक (डेलिबरेटिव्ह), जाहिरनामा (मॅनिफेस्टो), जोर (स्ट्रेस), दर्जा (स्टेटस), दुही, ध्येय, नागरिक हक्क, नाफेर पक्ष, प्रचारक, प्रांतिक सभा, मुखत्यार (डेलिगेट), सत्याग्रह, सविनय कायदेभंग, सर्वाधिकारी, संमेलन, सामुदायिक चळवळ, स्वयंनिर्णय, स्वागतमंडळ, स्वसत्ताक, स्वयंशासित, स्वावलंबन, स्मशानगीत, हस्तपत्रक.

**११) व्यापार :** नाकेबंदी, कमताना (बट्टा), पतपेढी, विलायती कापड, देशबुडवी दलाली, हुंडी.

**१२) वृत्तपत्रीय :** अग्रलेख, आन्हिक पत्र (डेली), आरती (टीका), इशारत, कर्णधार (संपादक), खेप (अंक), चरचरीत लेख, चाळणी (टीका), छेदक (प्यारा), बातमीदार, मथळा, मुद्रित (प्रूफ), राजद्रोह, लेखनस्वातंत्र्य, लेखणीहाक्ये, लेखणीपांडित्य, वहिवाटदार (मॅनेजर),

वाचिक प्रतिकार, वाटोळी जुडकीं, वार्ताहर, व्यवसायबंधु, शीर्षक (हेडिंग), शिरोलेख, सदर (कॉलम), सरकाजरजमा, स्फूट सूचना, सहसंपादक, सहकारी, सूतउवाच, सरस्वतीदान (कडक टीका), स्थलसंकोच, स्थानिक, ज्ञानाचा खंदक, इहवृत्त.

**१३) शास्त्रीय :** रसायनशाळा, पंचांग-शोधन, उत्क्रमणतत्त्व (इव्होल्यूशन), नियमबद्धतेची सार्वत्रिकता (यूनिफॉर्मिटी ऑफ लॉ), ज्ञेयशास्त्र, मनोधर्म (मॉरल इन्टेन्शन), सुखवाद (हिडॉनिझम), सत्यबोध, द्रव्य (मॅटर), गतिशक्ति (फोर्स), संवेदनशक्ति (कान्शसनेस), प्रयोगसिद्ध, किरणपट्टा (स्पेक्ट्रम), शास्त्रकलामंदिर, शब्दव्युत्पत्तिशास्त्र (फायलॉलजी), भुवनसंस्था, अंकपाश, पाण्यानें मलमूत्र वाहून नेणारा मोठा नाला (ड्रेनेज), चालक (डायरेक्टर), मर्की (प्लेग), संसर्गविरोध (सेग्रिगेशस), सरकपडदा (ड्रॉप), गोस्तनसीतला.

**१४) शिक्षण :** विशारद (ग्रॅज्युएट), माध्यम, महाविद्यालय, विश्वविद्यालय, उदार शिक्षण, सार्वजनिक शिक्षण, शास्तेमंडळी (गव्हर्निंग बॉडी), पुस्तकीविद्या, हस्तलिखित, ऐच्छिक, राष्ट्रीय वळण.

**१५) शेती :** फेरपाहणी, मालकी हक्क, सरकारी शेतवाडी (फार्म), सावकारी पेढी, कारागीर मंडळी, मदतीचा अर्ज, शेतपेढी, कुणबाऊ धाड, चारणफी, गोरक्षण.

**१६) सरकार :** अटक, अडथळा, अंतस्थ राज्यव्यवस्था, एकसत्ताक राज्य, एकमुखी सत्ता, कडक उपाय, कोठवळे, कोल्हेशाई, गट (पार्टी), गाव पोलीस (रामोशी), गुमास्ता (एजंट, व्हाइसराय, नोकरशाही), चिटणीस कचेरी, झारशाही, झोटिंगपातशाही, ताम्रपट, दडपशाही, नागडा स्वार्थ, पाशवी शक्ति (ब्रूटफोर्स), पांढरा हत्ती, प्रधानमंत्रि, प्रांतिकसरकार, फोडा व झोडा, भाषणबंदी, भारतमंत्री, शिक्केबाजी (व्हेटो, सर्टिफिकेशन), सनद (चार्टर), सभाबंदी कायदा,

## आम्ही कुणासाठी लिहितो?

आम्ही 'केसरी'त जे लेख लिहितो, ते केवळ राज्यकर्त्यांकरिता नसून आमच्या मनातील तळमळ किंवा जळफळ, मराठी वाचकांच्या मनात उतरावी एवढ्याकरिता आहेत. त्याचा परिणाम होत नसला तर आमचे श्रम फुकट गेले असे आम्ही समजू. लेखणीच्या टोकाने मषीपात्राच्या साहाय्याने पांढऱ्यावर काळे करण्याचा आमचा इरादा नाही. त्या लेखांचा परिणाम होण्यास आवश्यक अशीच भाषा आम्ही वापरतो.

- बाळ गंगाधर टिळक





अनुक्रमणिका

सामान्य लोकप्रतिनिधिसभा (हाऊस ऑफ कॉमन्स), सुभेदार (गव्हर्नर), सोटेशाही, सोटेबारगिरी, सुधारणा (रिफॉर्म), हडेलहप्पी राज्यव्यवस्था.

**१७) सामाजिक :** अंध-सुधारक, अस्पृश्य-वर्ग, मध्यमवर्ग, अति-मनुष्य (सुपरमॅन), अनुकरणेच्छा (फॅशन), नवविद्वेषी, पक्षाभास, मानपत्र, संमतिवय-बिल.

**१८) स्थानिकस्वराज्य-ग्रामसंस्था :** गावपंचायत-ग्रामसंस्था-स्वराज्याचा पाया, लोकनियुक्त पंच-पंचायत, स्थानिक-कमेटी (म्युनि.)-स्वराज्य-स्व.मळमळीत सौभाग्य-नियामक मंडळ, (बोर्ड ऑफ मॅनेजमेंट)-सभासद (कार्पोरेटर), नगरसभा, नगराध्यक्ष, घरपट्टी, स्थानिकसंस्था, कंपू (कॉकस), ग्रामपद्धति, ग्रामसंघटना.

**१९) किरकोळ :** उपनगर, उखळबेरी, कोकरउडी (वायफळ प्रयत्न, आनंद), खेदप्रदर्शन, खेळखाना (स्पोर्टिंग क्लब), गळपट्टी (नेक टाय), दारिद्र्यगृह (पुअर हाऊस), पराक्रम (कॅरेक्टर), बकाली (कॉस्मापॉलिटन), शार्मण्य (जर्मन), शृंगापत्ति, सामना (मॅच), गोरे उडाणटप्पू, दवदव (त्रास), रोजनामा (डायरी), फर्माईष (फॅशनेबल), हस्तांदोलन, शिष्टाचाराचा खून, साखरावगुंठित, भीस (लोकर), औत्पादिक, मजलीस नशीन (अध्यक्ष), अनुध्यां, एकांडेपणा, ऐतिहासिक ठेच.

**२०) कोटी-वाक्प्रचार-म्हणी :** अठरापगड जातींत ही टोपीवाल्यांची जात एकोणिसावी आली, आई (हुंडणावळाई), आधीं मैत्रिणी मग सोबतिणी व शेवटी ख्रिस्तिणी करून टाकणे, आमच्या पायगतची नदी उशागतीं नेऊन ठेविली, संस्थानिकांच्या हक्काची उतरती श्रेढी, भरल्या पोटी पांडित्य, करदीपिका भार्या (म्हातारा नवरा-लहान नवरी), गणेशचतुर्थीचे चंद्रनिरीक्षण (राजद्रोहाचा आरोप), उजाडले पण सूर्य कोठें आहे, धाबळींतील खबुतरें (बगलबच्चे), शहाणपण सत्तेंत आहे दैन्यांत नाही, रात्रीं खा तूप आणि सकाळीं बघ रूप, वरच्यास हात खालच्यास लाथ.

यांप्रमाणें २० विभागांत एकंदर शब्द विभागले. शक १८०२ (केसरी) पूर्वी मराठीत वर्तमानपत्रें व मासिकें निघत होतीं. तेव्हां त्यांनीं कांहीं पारिभाषिक शब्द निर्माण केले असतीलहि. पण अशांची संख्या फार थोडी असावी, कारण हे संपादक बहुश: इंग्रजी शब्द वापरीत. राष्ट्रीय सभेचें जीवन यापुढें सुरू झालें आणि त्यामुळें राष्ट्रीय विचारांचा ओघ देशात वाहूं लागला. या





अनुक्रमणिका

ओघात परकीय भाषेंत विचार करण्याची, बोलण्याची व लिहिण्याची विद्वानांची सवय वाहून जाऊं लागली आणि स्वभाषेंतील शब्दसृष्टीस प्रारंभ झाला. तिचें त्रोटक स्वरूप वर दाखिवलें आहे. केसरीनें स्वतः निर्माण केलेले शब्द जसे यांत आहेत तसेच अनेक लेखकांनाहि तयार केलेले शब्द आहेत. केसरीनें त्यांच्या शब्दांची आपण होऊन प्रसृति केली. त्यामुळें या लेखाला 'केसरीनें प्रसृत केलेली परिभाषा' असें नांव दिलें आहे. पूर्वी सांगितल्याप्रमाणे हा पारिभाषिक लेख वेळेच्या व स्थलाच्या अभावीं अपुरा झाल्यानें यांत भर घालून जास्त मोठा करण्यास कोणासहि सवड ठेविली आहे. कारण केसरीनें म्हटलेंच आहे कीं, 'देशांत संपत्ति कितीहि विपुल असली तरी तिचा एके ठिकाणीं ज्याप्रमाणें व्यवस्थित संग्रह करावा लागतो, तद्वतच...शब्दरत्नें मोठ्या काळजीनें आणि व्यवस्थित रीतीनें संग्रहित करावीं लागतात.' (के.१९०३ अं.४२)

■

(प्रस्तुत लेख 'केसरी-प्रबोध' या द०वि० आपटे, श्री०म० माटे, स०वि० बापट, पां०मा० चांदोरकर, रा०ग० हर्षे, श्री०रा० टिकेकर, शं०ना० जोशी ह्यांनी संपादित केलेल्या आणि केसरी-महोत्सव-मंडळ, पुणे, यांनी शके १८५३, सन १९३१मध्ये प्रकाशित केलेल्या पुस्तकातून घेतला आहे. मूळ ग्रंथातील तत्कालीन लेखनविषयक नियमानुसार असलेले लेखन येथे तसेच ठेवले आहे.) (पडघम माध्यमनामा - आबा चांदोरकर यांच्या सौजन्याने.)

## 'केसरी'साठी नवी भाषा निर्माण करावी लागली

'केसरी'च्या भाषेविषयी श्री० काका कालेलकरांना टिळक म्हणाले, "आम्हांला केसरीसाठी नवी भाषा निर्माण करावी लागली. जुन्या मराठीत भक्ती होती, वेदान्त होता. त्यात शाहीरांनी नि गोंधळ्यांनी वीररसाची भर घातली. पण राजकारणाची गंभीर चर्चा, वादविवाद, थट्टा, उपहास इत्यादी गोष्टी व्यक्त करण्यासाठी आम्हांला राजकीय विषयाची परिभाषाच बनवावी लागली."

*- स०वि० बापट ('लो० टिळक यांच्या आठवणी व आख्यायिका')*

# कर्ताविहीन क्रियापदे

अविनाश बिनीवाले

क्रिया घडते पण तिथे व्याकरणिक कर्ता नसतो, कर्तृत्व दर्शवणारे पदच वाक्यात नसते, फक्त क्रियापद असते. अशी एकाच शब्दाची वाक्यरचना एखाद्या भाषेत असू शकते का? होय, असते, आहे! आपल्या मराठी भाषेतच अशी वाक्यरचना होते, कर्ता वा कर्म नसलेले केवळ एका शब्दाचे वाक्य!

अशी क्रियापदे संख्येने कमी असली तरी त्यांचा उपयोग बराच होतो, त्यांची वारंवारिता बऱ्यापैकी आहे. गंमत म्हणजे ही सर्व क्रियापदे मूलतः निसर्गाशी संबंधित आहेत. उदा॰

१. फटफटणे - फटफटले. आता निघायला हवे.
२. पहाटणे - पहाटले. योग करा.
३. उजाडणे - उजाडले. उठा आता.
४. सांजावणे - सांजावले. दिवे लावा.
५. अंधारणे - अंधारले. आता मुक्काम करावा.

ह्या क्रियापदांबरोबर क्रियाविशेषण, अव्यय वगैरे शब्द येतात, येऊ शकतात पण कर्तावाचक पद कधीही येत नाही. (अकर्मक क्रियापदांबरोबर जसे कर्म कधीही येत नाही, तसे ह्या क्रियापदांबरोबर कर्ता वा कर्म कधीही येत नाही.)

ही पाचही क्रियापदे नेहमी तृतीय पुरुषी नि एकवचनी चालविली जातात, कारण सोबत कर्ता नसतो की कर्म नसते, त्यामुळे क्रियापदाचे रूप नपुंसकलिंगीच असते. अशा प्रकारची क्रियापदे भारतातल्या इतर कोणत्याच भाषेत आढळत नाहीत. ह्या संदर्भात मराठी ही एकमेव, अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण भाषा आहे.

मराठी भाषेची अशी आणखीही बरीच वैशिष्ट्ये नक्कीच असतील, उदा॰ 'नसणे'सारखे क्रियापद. आपण ती सारी वैशिष्ट्ये अभ्यासाने शोधून काढून त्यावर भारतीय भाषांशी नि युरोपीय भाषांशी तुलना करून विस्ताराने लिहायला पाहिजे.

ह्या कर्ताविहीन क्रियापदांची जरमॅनिक भाषांशी तुलना करून पाहणे रोचक नि उद्बोधक होईल. इंग्लिश नि जर्मन ह्या दोन भाषांमधली काही उदाहरणे पाहू.

पाऊस पडणे, हिमपात होणे, गारा पडणे अशा नैसर्गिक क्रिया अतिशय गुंतागुंतीच्या असतात. त्यात अनेक घटकांचा अंतर्भाव असतो, त्यामुळे अशा क्रियांमध्ये अमुक एक

घटक कर्ता आहे, असे दाखवणे तर्कतः शक्य नसते नि त्या क्रियेला कारणीभूत असलेले सर्व घटक कर्ता म्हणून दाखवणेही व्यावहारिकदृष्ट्या सोयीचे होत नाही, म्हणून एक व्याकरणिक पद कर्ता (ग्रॅमॅटिकल् सब्जेक्ट्) म्हणून दाखवतात, उदा॰ इंग्लिशमध्ये अशा जागी it हा शब्द कर्ता म्हणून वापरला जातो.

मराठीतल्या ह्या प्रकारच्या क्रियापदांप्रमाणे इंग्लिश नि जर्मन भाषांमध्येही it/es नंतर क्रियापदाचे रूप हे नेहमी तृतीय पुरुषी, एकवचनी आणि नपुंसकलिंगीच असते. उदा॰

It rains.

It thunders.

It hails. इत्यादी.

जर्मन भाषेत असेच होते. (ऐतिहासिक दृष्ट्या सांगायचे तर जर्मनमध्ये असे होते म्हणून इंग्लिशमध्ये तसे होते. जर्मनमध्ये es एस् हा कर्ता मानला जातो -

Es regent - एस् रेग्नेट् - पाऊस पडतो आहे.

Es donnert - एस् डॉनर्ट् - गडगडाट होत आहे.

Es hagelt - एस् हागल्ट् - गारा पडत आहेत.

Es blitzt - एस् ब्लित्स्ट्- वीज चमचमते, इत्यादी.

रूसी ह्या स्लाविक वंशाच्या भाषेत असे होत नाही. तिथे मराठीप्रमाणे कर्ताविहीन रचना होत नाही की जरमॅनिक भाषांप्रमाणे व्याकरणिक कर्ताही मानलेला नसतो तर सरळ कर्ता, क्रियापद अशी साधी, सरळ रचना होते. उदा॰ 'पाऊस पडतो' हे वाक्य रूसी भाषेत अगदी मराठी वाक्यासारखेच केले जाते -

'इद्योत् दोझ्द्.' (पाऊस येतो/पडतो)

'इद्योत् स्नेक्.' (बर्फ येतो/पडतो).

इद्योत् म्हणजे येतो नि दोझ्द् म्हणजे पाऊस, स्नेक् म्हणजे बर्फ.

जरमॅनिक भाषांमध्ये अशी रूसी/मराठीसारखी रचना (रेन् फॉल्स्) सामान्यतः होत नाही. (पण भारतीय भाषांच्या प्रभावामुळे) इंडियन इंग्लिशमध्ये होते.

■





अनुक्रमणिका

# दासोपंत-विरचित गीतार्णवातील भाषाभान

विद्यासागर पाटंगणकर

बहमनीकाळातील एक बहुआयामी आणि बहुभाषिक मराठी कवी म्हणजे संत दासोपंत होत. दासोपंत त्यांच्या 'पासोडी' लेखनासाठी सर्वज्ञात आहेतच, परंतु त्यांचा 'गीतार्णव' हा ग्रंथ भगवद्गीतेवरील एक प्रदीर्घ टीकाभाष्य होय. 'गीतार्णवा'चा भाषिक अभ्यास (अ०१८) असा स्वतंत्र प्रबंध पूर्वी मराठवाडा विद्यापीठात सादर झालेला आहेच. म्हणजे भाषा-शब्दविशेष-व्याकरण विशेष या दृष्टीने 'गीतार्णवा'चे निश्चितच मोल आहे.

'गीतार्णवा'च्या भाषिक अंगाची पाहणी करता त्यातील विशिष्ट भाषा-प्रयोग, शब्दविशेष, शब्दघटना लक्ष वेधून घेतात. त्यातील काही बाबींचा निर्देश प्रस्तुत लेखात केला आहे. 'दासोपंतकृत गीतार्णवाचा शब्दार्थ संदर्भकोश' या राज्य मराठी विकास संस्थेद्वारा चालू असलेल्या प्रकल्पात काम करताना 'गीतार्णवा'ची जी विशेषता जाणवली, त्याचा एक नमुना येथे देत आहे.

**लोकजीवनसंदर्भ :** दासोपंतांचा लोकजीवनाशी व लोकसंस्कृतीशी घनिष्ठ संबंध होता. त्यांनी स्वतंत्र 'ळळिता'ची पदे लिहिली आहेतच. त्यात विविध लोककलाकार, कलाजीवी, गानोपजीवी समाज त्यांनी पदांमधून उभा केला आहे. परंतु 'गीतार्णवा'तही त्याचे संदर्भ सहज मिळतात. 'मागते' (१८.२५००) कोल्हाटी, बहुरुपी, भाट, गोंधळी, मुंढे (१६.२०४१, ४२) यांची 'दानपात्र' शब्दांत संपादणी करुन कळसूत्री बाहुल्यांसाठी 'खांबसूत्र', 'चित्रमंडळीची बाहुली' असा ते उल्लेख करतात. 'पायाळ' हा संकेतही वापरून लोकमानसाचे भान प्रकट करतात.

**भाषाप्रभुत्व :** गीतार्णवातील भाषाविशेष वा शब्दविशेषांचा विचार करता त्यांनी मराठी, संकृत, कन्नड, फार्सी, तेलुगु, देश्य असे कितीतरी शब्द वापरले आहेतच (गीतार्णवाच्या १८व्या अध्यायाचा भाषिक अभ्यास), परंतु या शिवाय त्यांनी कित्येक संस्कृत शब्दाचे रूप बदलून ते मराठी वळणाने वापरतात. उदा० 'कार्पण्य', 'वोसरे' हा शब्द वर्षाव करणे या अर्थी ते वापरतात (अभ्रा आडूनिवोसरे) (जीवत्व वोसरे) इ० त्यांची ही भाषेवरील हुकमत लक्षणीय आहे.

**नवशब्दनिर्मिती :** नवशब्दनिर्मिती हे दासोपंतांचे खास वैशिष्ट्य होय. लेखनाच्या ओघात ते सहज नवशब्द घडवतात. उदा० 'सांगीकरण' (१८.१०२), 'मुखदुष्ट' (२६७), 'बाळरंडा' (३१६), 'धान्यचर', 'अजीर्णवंत', 'राजेष्ठुकामठु' (८७०), 'ज्वरित', 'दादूनिया' (५८९). नदीवरच्या घाटासाठी 'पाषाणबद्ध सोपान' असा शब्द ते घडवतात.

**नामविशेष :** भाववाचक नामात 'रचादुळपणे' (९५५), 'अवंचकपण', 'साधुकारी',

'पादार्थिक' असे शब्द, तसेच नामाचे क्रियापदाच्या पद्धतीने रूप करताना 'मोहला', 'पुंजती', 'हविजे', 'क्षपिजे', 'प्रेरावे', 'अस्तवे', 'अभावली' अशी रूपे दिसतात. 'सासुरवासीपण' असाही उल्लेख ते करतात. त्याचप्रमाणे, 'स्वातंत्र्य'ऐवजी 'स्वातंत्र्यता' किंवा 'निर्भाग्यता', 'लौल्यता', 'गौळ्यता' अशी व्याकरणदृष्ट्या सदोष असलेलीही रूपे वापरलेली आढळतात.

**नादानुकारित्व :** नादानुकारी शब्दांत 'चळचळट', 'करकरा', 'दंवदंवित', 'खळखळा' अशी शब्दकळा दिसते. 'हाट चौहाट', 'मतवादु', 'कवडीबटा' सारखे शब्द येतात.

**वाक्प्रयोग :** दासोपंतांच्या 'गीतार्णवा'तील शब्दशैली विशेषांचा विचार करता वाक्प्रयोगांचाही उल्लेख करावा लागतो. 'धान्यकनात येणे' (कवी बा० भ० बोरकर यांच्या कवितेतील 'कुठे दुधावर आली शेते' याची आठवण व्हावी), 'परतिधरी', 'तृणाचा मेरु' (राईचा पर्वत म्हणतो), 'खटीचा पशू', 'अव्वा सव्वा' (अव्हा सव्हा) इ० वाक्प्रयोग दिसतात.

**तत्सम-तद्भव :** देश्य शब्दांत 'बाळरंडा', 'आवा', 'मुमुर' सारखे शब्द जसे दिसतात, तसेच 'फुडे'सारखा शब्द दक्षिण कोकणीत कुडाळमध्ये आढळतो असे कोशकार दाते नोंदवतात. तत्सम शब्दांत 'अरणी'सारखा शब्द दिसतो. परंतु या शब्दाचा अर्थ श्री० मोहोळकरांनी 'ओटा' असा नोंदवला आहे (पाहा- 'दासोपंतविरचित गीतार्णव अध्याय १८ : एक अभ्यास'). वास्तविक त्याचा अर्थ यज्ञीय संस्कृतीशी संबंधित असून अग्नी उत्पन्न करण्याचे साधन असा आहे. संस्कृतनिष्ठ शब्दांत अग्निकु, तद्वर्तन, वीचिका इ० शब्द ते सहजपणे वापरतात. दीर्घसामासिक शब्द हेही त्यांचे वैशिष्ट्य आहे. त्यात 'रजोपस्कृत ज्ञान', 'कृतापूर्वाभ्यास', 'अकर्तात्मज्ञता' इ० 'गाळी', 'पास बैसले', 'गजब' अशी हिंदी रूपे, 'पुरावा' अन्य भाषेतील शब्द ते उपयोजतात. 'सानुकुल्ल', 'निर्मल्ल', 'सकल्ल', 'विकल्ल', 'आल्लके', 'कित्ती', 'इंगल्ल', 'खेल्ल' अशा लकबी दिसतात.

**अपरिचित संज्ञा :** दासोपंतांच्या गीतार्णवात पारमार्थिक शब्दसंहती, योगऱ्या ग यांची परिभाषा, आयुर्वेद, कृषी, व्यापार इ० क्षेत्रांतील शब्द दिसतात. १५-१६व्या शतकांतील जीवनाची वैशिष्ट्ये त्यातून लक्षात येतात. त्यात आज अपरिचित अनेक शब्दरूपे वा संज्ञा आहेत. 'शोभनिका' (शेणी), 'अवदान', 'अरणी', 'विरजाहोम', 'तेपर्ण', 'स्नकस्नवे', 'इध्म', 'दक्षिणाग्नी' इत्यादी. 'प्रस्था' (१८.२५६४) हा शब्द आज अपरिचित झालाय. त्याचा अर्थ लग्न-मुंजीप्रीत्यर्थ दिलेले भोजन – म्हणजे आजचे स्वरुची (सुरुची) भोजन होय. पण दासोपंतांच्या काळी तो सर्वज्ञात असावा.

**वर्णविपर्यय :** दासोपंतांनी वर्णविपर्यय केलेला दिसतो. उदा० माळवे (मावळे), तर्डक

(तर्कट), चुबकळले (बुचकळले) यश्रृती वश्रृतीच ची उदाहरणेही दिसतात. (नासली>नाशली; न्यावो>न्याय इ०)

**भिन्नार्थदर्शक :** याशिवाय रूढार्थाहून भिन्नार्थाने वापरलेले अनेक शब्द इथे आढळतात. उदा० प्रमितचि (अपरिमित याअर्थी), मृदपण (मऊपणा), बळात्कारे (जबरदस्तीने), महानुभाव (अनुभविक), परोक्ष-अपरोक्ष इ०

**विशेष :** विशेष नोंदविण्यासारखी बाब म्हणजे 'गाहाळ' हा शब्द केवळ दासोपंतच वापरतात. कारण शब्दकोशातही अर्थ देताना कोशकार दाते यांनी फक्त दासोपंतांच्या गीतार्णवातील ओवींचा संदर्भ दिला आहे. (गी० १.१४२६) २१ शब्द अध्याय ९.७४८, अध्याय १८.३८२८ मध्ये दिसतो.

थोडक्यात दासोपंतांच्या 'गीतार्णवा'च्या निमित्ताने १५-१६व्या शतकातील एक व्यापक भाषिक अवकाश, त्यातील सांकृतिक व सामाजिक-अध्यात्मिक संदर्भासह उलगडतो, हे लक्षणीय होय.



## संदर्भ

१. दासोपंत विरचित गीतार्णव, अध्याय १८वा, संपा० वा०ल० कुलकर्णी, सुधीर रसाळ, मराठवाडा विद्यापीठ प्रकाशन, १९८५

२. दासोपंत विरचित गीतार्णव, अध्याय १६वा, संपा० डॉ० चंद्रकांत देऊळगावकर व इतर, साहित्य संस्कृती मंडळ प्रकाशन, २००७

३. दासोपंत विरचित गीतार्णव, १८वा अध्याय : एक भाषिक अभ्यास, गोपाळ मोहोळकर, मुकुंदराज प्रकाशन, उमरगा, १९८९

४. मराठवाडा विद्यापीठ पत्रिका, (१९६०-६१; वर्ष १, अंक १) संपा० वा०ल० कुळकर्णी, सुधीर रसाळ

५. ग्रंथराज (दासोपंतकृत), रा०द० अरगडे, दासोपंत संशोधन मंडळ, अंबाजोगाई

६. मराठी व्युत्पत्तिकोश, संपा० कृ०पां० कुलकर्णी, शुभदा सारस्वत प्रकाशन, पुणे, २०१३

# त्र्यं०वि० सरदेशमुख ह्यांच्या कादंबरीलेखनातील भाषाविशेष

**प्रिया निघोजकर**

विचार व भाव ह्यांच्या अभिव्यक्तीसाठी शब्दांचे महत्त्व खूप आहे. शब्दकळा, शब्दसंग्रह, शब्दनिर्माणाची शक्ती या साऱ्या घटकांना वाङ्मयीन व्यवहारात महत्त्व आहे. एखादा जाणता लेखक नवीन शब्दांची निर्मिती अकारण करत नाही. स्वतःला अपेक्षित असलेली अर्थच्छटा आढळेपर्यंत तो चिंतनमग्न असतो. उचित अर्थच्छटेचा शब्द सुचला की, तो नवा प्रदेश दिसल्यासारखा हरखून जातो. कधी एखादा सामासिक शब्द, कधी एखादे विशेषण, तर कधी क्रियापदाचेच रूप बदलून निर्माण झालेला शब्द जाणत्या लेखकाच्या संहितेमध्ये अवतरतो. वाचकाला अशा शब्दांसाठी नवा पर्यायी शब्द देता येत नाही. माउली म्हणतात तसे आकाश आपल्या संवेदनेच्या कवेत यावे आणि अनुभवामागचा हृदयाचा अवकाश प्रतीत व्हावा. हाच हेतू प्रतिभावंत, जाणीवसंपन्न लेखकाचा असतो. प्रा० त्र्यं०वि० सरदेशमुख हे असेच प्रतिभावंत साहित्यिक होत. कथा, कविता, नाटक, कादंबरी, अनुवादित लेखन, समीक्षा अशा ललित व ललितेतर साहित्यप्रकारांत त्यांनी लेखन केले आहे, असे असले तरी मराठी वाचकांना मराठी साहित्यसृष्टीतील साक्षेपी समीक्षक, कादंबरीकार म्हणून त्र्यं०वि० सरदेशमुख सर्वपरिचित आहेत. 'कादंबरीत्रय' म्हणूनही त्यांची ओळख आहे. ललितलेखनातील त्यांच्या भाषाविशेषाने आणि भावसौंदर्याने त्यांनी आपले वेगळेपण जपले आहे. त्यांच्या कादंबरी लेखनातील भाषा विशेषाचा येथे परामर्श घेतला आहे.

सरदेशमुखांनी 'ससेमिरा' (१९४४), 'बखर : एका राजाची' (१९७२), 'उच्छाद' (१९७८), 'डांगोराः एका नगरीचा' (१९९८) ह्या चारच स्वतंत्र कादंबऱ्या लिहिल्या. हरमान हेसेच्या 'सिद्धार्थ' ह्या कादंबरीचा 'नदीपार' (१९५९) हा मराठी अनुवाद त्यांनी केला. पुढे अनेक वर्षांनी परिष्करण करून हीच अनुवादित कादंबरी त्यांनी 'सिद्धार्थ आणि पूर्वेची यात्रा' (२००३) ह्या शीर्षकाने प्रकाशित केली. सरदेशमुखांचे कादंबरीलेखन संख्येने कमी असले तरी गुणात्मकदृष्ट्या ते लक्षणीय आहे. ह्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे सरदेशमुखांची 'शब्दकळा' हे होय.

वाचकांसोबत शब्द संवादी कधी होतात, तर जेव्हा लेखकाने वापरलेला शब्द आपल्या परिचयाचा असतो, त्यातील गर्भितार्थ आपल्याला उमजतो. 'प्रत्ययकारिता' नसेल तर भाषा निर्जीवच ठरते. सरदेशमुखांनी कादंबरीच्या आशयाची मांडणी करताना शब्दांचे

अलंकरण अथवा प्रभाव महत्त्वाचा मानला नाही; तर भावप्रत्ययाला त्यांनी अधिक महत्त्व दिले. ते शब्दयोजनेबद्दल सजग होते. उपजत जाणतेपणाला त्यांनी भाषाशास्त्राच्या स्वतंत्र अभ्यासाची जोड दिली. संत ज्ञानेश्वर, जे० कृष्णमूर्ती, योगी अरविंद, बा०सी० मर्ढेकर, बालकवी अशा तत्त्वज्ञ, भावज्ञ, रसज्ञ, कवी-हृदयाच्या व्यक्तींच्या भाषेचे त्यांनी चिंतन केले. त्याचे रसग्रहण केले आणि एक नवीन परिभाषा निर्मिली. परंपरेविषयी नम्र भाव ठेवत, प्राचीन-आधुनिकतेचा सुमेळ साधत सरदेशमुखांनी आपली भाषा फुलवली. कधी उपसर्ग वगळून, कधी प्रत्यय बाजूला सारून, कधी नवाच सामासिक शब्द तयार करून तर कधी एखाद्या महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सीमेवरील बोली भाषेतील शब्दाला अपेक्षित अर्थरूप देऊन सरदेशमुखांनी नव्या शब्दांची निर्मिती केली आहे. अशा शब्दांनी अभिव्यक्तीला एक हृद्गताचं सौंदर्य प्राप्त होते. अभिरुचीला एक उंची प्राप्त होते. आपल्या मायबोलीचे देशीपण अबाधित ठेवून सहजपणे सामावून घेतलेले तत्सम आणि तद्भव शब्द भावरूपाला देखणे करतात. त्याहून महत्त्वाची गोष्ट म्हणजे सरदेशमुखांनी ह्या देखणेपणाला संवेद्य केल्याने, त्याला प्रत्ययकारितेचे लेणे बहाल केल्याने ते शब्द वाचकांना हृदयापर्यंतचा भावप्रवास घडवतात. ह्या भावमोहनातच वाचक बराच काळ स्वतःला झोकून देतात नि त्याचा आनंद अनुभवतात. ही किमया केवळ शब्दांच्याच बाबतीत घडते असे नव्हे; तर कादंबऱ्यांमधील अनेक अवतरणेही हा प्रत्यय देतात. 'बखर : एका राजाची' कादंबरीतील 'ओठंगत' (पृ० २), 'उताणखाट' (पृ० १३), 'खळेलूट' (पृ० ३३), 'साखरसुरत' (पृ० ४६), 'हांडगेपणा' (पृ० ४७), 'विधोशी' (पृ० ७२), 'पैखाना' (पृ० १७७) असे काही शब्द उदाहरणादाखल सांगता येतील.

'बखर : एका राजाची' ही राजा रघुवीरसिंहाची दुर्दैवी जीवनकहाणी आहे. राजाच्या आत्माविष्करणाला गहिऱ्या आत्मनिष्ठेचे रंग चढविण्यासाठी सरदेशमुखांनी रोजनिशीद्वारे आत्मनिवेदनाची भाषा योजिली आहे. ती विलक्षण प्रत्ययकारी आहे. 'बखरी'च्या राजाचे व्यथित जीवन दुर्दैवाच्या दशावताराचे लीलानाटक कसे होते हे त्याच्याच तोंडून वदवताना सरदेशमुख लिहितात, 'जाणूनबुजून दिल्या धडका बुरुजाला, आणि छिनून घेतला टवका-टवका. रात्र-रात्र वितळून गेली हंड्याझुंबरांच्या साक्षीनं. रांजणाच्या तळाशी साचत राहिला प्राक्तनाचा गाळ, आणि भविष्याच्या दिशा देखोदेशी भेगाळून गेल्या' ('बखर :...' पृ० १६८). राजाच्या मनाची स्पंदने टिपताना सरदेशमुखांची भाषा अधिक धारदार होते ती अशी, 'झोपेला चिरफाडून सदाच एक खवीस समंध दिसायचा कोपऱ्याकोपऱ्यात. झुंबरातल्या मेणबत्त्या जायच्या स्फुंदत-स्फुंदत वाऱ्याच्या झुळुकांवरून... आणि तावदानांच्या सळ्या दिसायच्या वेड्यावाकड्या होऊन हालत असलेल्या... गच्चीवर

वाजायची सडक पाऊलबोटं कुणाची...?' (पृ० १६८). त्याबरोबरच रघुवीराचा उत्कट भाव व्यक्तवताना ही भाषादेखील कशी तरल होते पहा – दमयंती व राजस यांच्या भेटीची तुलना करताना राजा म्हणतो, 'एक रात्र... आणि दुसरी रात्र. एका पाठोपाठ एक एक दुसरीला वेडावणारी. एक भोग आणि दुसराही एक भोग'. (पृ० ६४) या वर्णनातून सरदेशमुखांनी मानवी जीवनाच्या सनातन भावनेलाच हात घातला आहे. 'भोग' शब्दाची हेतुपुरस्सर केलेली पुनरुक्ती व त्यातील अर्थवाही भाव सुज्ञ वाचकाला स्तिमित केल्याशिवाय राहत नाही. 'बखर : एका राजाची' ह्या कादंबरीत सरदेशमुखांच्या अशा उत्कट, तरल नि संयत भाषेचे दर्शन घडते.

'डांगोरा : एका नगरीचा' ह्या कादंबरीच्या प्रारंभीच व्हिक्टर ह्यूगोच्या एका अवतरणाचा अनुवाद सरदेशमुखांनी उद्धृत केला आहे तो असा – 'अथांग छोट्या गोष्टींनी, अथांग मोठेपण तुम्हांला चिरडते, समुद्र नाही का थेंबाथेंबांनी आपल्याला बुडवतो' येथूनच वाचक कादंबरीच्या आशयाच्या बाबतीत सावध होतो नि त्या अवधानानेच वाचनाला प्रारंभ करतो.

सरदेशमुखांनी कादंबरीत बऱ्याच ठिकाणी नेहमीच्या वापरातील शब्द थोडे वळवून घेतले आहेत. उदा० 'अट्टाग्रह'ऐवजी 'हटाग्रह', 'खिसगणती'ऐवजी 'किसगणती', 'चारित्र्यवान'ऐवजी 'सुचरित', 'उदासपणा'ऐवजी 'उदासखाना', 'नेहमी'ऐवजी 'हरहमेश', 'पसाभर' किंवा 'मूठभर'ऐवजी 'पसामूठ', 'सोपा'ऐवजी 'सवघड', 'चिवटपण'ऐवजी 'जिवटपण', 'घरकोंबडी'ऐवजी 'घरबशी', 'चिंब भिजून'ऐवजी 'चिमून'... वगैरे अशी अनेक उदाहरणे कादंबरीच्या पानोपानी पाहायला मिळतात. हेच भाषेचे सौंदर्य अनेक अवतरणांमधूनही अनुभवायला मिळते. उदा० 'मनाची व्यथा उखडून टाकता आली नाही की खोल खोल खणतच जाते : पिंपळाचं बी गच्चीच्या कुंभीत एकदा का रुजून बसलं की चिरेबंदीही उलून काढतं' (पृ० २४), 'काळाचा पडदा कोणत्याही क्षणी उभाआडवा फाटून जातो', 'अज्ञेयाचा जबडा उघडतो न् माणूस इतिहासजमा होऊ शकतो' (पृ० ३१). अशी अनेक अवतरणे वाचकांना थबकवतात. अंतर्मुख करतात. हे सरदेशमुखांच्या भावगर्भ भाषेचे यश आहे.

'उच्छाद' ही सरदेशमुखांची कादंबरी सर्वार्थाने काव्यात्मक आहे. ही काव्यात्मकता विविधांगी आणि बहुस्तरीय आहे. कादंबरीच्या यशस्वितेत सरदेशमुखांची अर्थगर्भ व भावगर्भ शब्दयोजना महत्त्वाची ठरली आहे. उदाहरणादाखल काही शब्द सांगता येतील. ते असे – 'दफनदरी', 'बाझवत', 'लेंढार', 'नागवानिस्स', 'वेडभंग', 'धरमधक्का', 'नित्राण', 'फन्ना', 'हुच्चपणा', 'हुंबपणाच', 'हुमांडीनं', 'खवडेलपणा', 'जळभार' आदी. एखाद्या

सिद्धहस्त चित्रकाराच्या सामर्थ्याने, शब्दकुंचल्याच्या मोजक्या फटकाऱ्यांनी आणि फिनिशिंग टचेस् नी सरदेशमुख आपल्यापुढे अनेक व्यक्तिरेखा सादर करतात. 'आपले पाय चिखलाचे, हात मेणाचे, काळीज मात्र ज्योतीचं' (पृ० ६). हे श्रीधरचे आत्मनिवेदन असो अथवा 'अलीकडे खंदक, पलीकडे भुयार, कुठं भोवरा, कुठं निखारा... एक भयाण डांबरट आकाश... त्याची एक नजरबंदी...' अशा गतिमान पंक्ती असोत, अथवा 'शरीरं जुळतात तरी मनं कुठं उडून जातात आणि मनं मिळतात तरी शरीरांची घरटी उजाड का राहतात?' 'माणसाचे संबंध इतरे भंगूर आणि आयुष्य इतकं ठकबाज असू शकतं?', असे मानवी प्रज्ञेचा प्रवाह कुंठित करणारे प्रश्न असोत – सरदेशमुखांची शब्दकळा, त्यातला काव्यात्मभाव आणि गहन वेदनेचा हुंकार वाचकांच्या हृदयात उमटतो. आणखी एक उदाहरण देता येईल. एक साधेच वाक्य पण केवढे मोठे तत्त्वज्ञान सांगून जाते. ते असे – 'माणसाचा चेहरा म्हणजे सगळा माणूस नव्हे' (पृ० २०). अल्पाक्षरत्व हा काही सरदेशमुखांच्या लेखणीचा गुण नव्हे, परंतु कादंबरीतील अशी छोटी वाक्ये, अवतरणे वाचकांना जीवनाचे व्यापकपण दाखवतात. संवेदनांच्या मुळाशी घेऊन जातात. आता हेच वाक्य पाहा – 'संवेदना जितकी व्यापक तितकी ती दुःखाच्या आक्रमणाखाली चिरडली जाण्याची शक्यता... जितकी तरल, तितकी क्रोधानं, द्वेषानं, मत्सरानं फाटली जाण्याची... कलानिर्माणात गुंतलेल्या मनाचे व्यापार या फाटलेपणावर हळुवार लेप देऊ शकतात' (पृ० १३७-३८). कोणीही संवेदनशील वाचक या वाक्याजवळ थबकला नाही तरच नवल! कादंबरीच्या कथानकाला प्रवाही ठेवण्यात ही अवतरणे जशी साहाय्यभूत होतात तशीच स्वतंत्ररीत्या तत्त्वविवेचनही करतात.

सरदेशमुखांच्या भाषेचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे शृंगारक्रीडेतील तरल भावदेखील भडक न करता त्यांनी संयतपणाने व्यक्त केला आहे आणि त्यामुळे त्या भावनेची तीव्रता कुठेही कमी न होता ती अधिकच उत्कट, हळुवार झाली आहे. त्यासाठी ही काही उदाहरणे पाहा – 'स्पर्शाला एक शैली असते... तिच्यानं किती आकारांचं रूप दिसतं आणि ते आपल्यात चेतनेचा झंकार कसा छेडतं ते मी अनुभवलं' (पृ० १५६). 'बखर...' कादंबरीत अशी अनेक अवतरणे आहेत. उदा० 'पुरुषातलं आणि स्त्रीतलं चैतन्य तेवढं त्या रात्रीच्या सर्व प्रहरांना अखंड व्यापून राहिलं होतं. त्या चैतन्याला सुख मिळविण्यापेक्षा सुखी करण्याची तहान होती. तहान शमवणारं आणि भडकवणारं चंद्रामृत ओठाच्या प्याल्यांतून ओतलं जात होतं, शोषलं जात होतं'. ('बखर...' पृ० ८०).

सरदेशमुखांच्या भाषेचा रसास्वाद हा वाचकांनी त्यांच्या कादंबरीवाचनातूनच घ्यायला हवा आणि भावसमृद्ध व्हायला हवे. सरदेशमुखांना त्यांच्या कादंबरीलेखनासंदर्भात





अनुक्रमणिका

अभिप्राय देणारी अनेक पत्रे आली. एक उदाहरण म्हणून येथे गो०नी० दांडेकरांचा 'बखर...' कादंबरीवरील अभिप्राय देत आहे तो असा – 'बखर प्रथम वाचली. शहारलो. गेल्या ५-७ वर्षांत ह्या जातीचे वाचले नव्हते. ती सांभाळून परत कपाटात ठेवली. ज्या पुस्तकांचे पुनर्वाचन करायते असते, त्यांच्यामध्ये काल-परवा बाहेर काढून पुन्हा वाचली, आणि मग त्याच जागी ठेवली परत एकदा वाचण्यासाठी. सरदेशमुख, तुम्हांला मुजरा. हे सर्व कुठून मिळवलेत? ही शैली? हे शब्दभांडार? त्या लेखनात हरवून जाणे? हा तपशील? तुमचं विलक्षण आहे. स्वतः जंगलात, परकायाप्रवेशाचे अतर्क्य करून दाखविलेत!'

महेश एलकुंचवार ह्यांनी सरदेशमुखांच्या शब्दयोजनेबद्दल, एक महत्त्वाचा अभिप्राय नोंदविला आहे. ते म्हणतात, 'सरदेशमुख कोणताही शब्द चूष म्हणून वापरत नाहीत. त्यांनी योजलेल्या शब्दाला आपण प्रतिशब्द देऊ शकत नाही'. ही सरदेशमुखांची प्रतिभाशक्ती. सरदेशमुखांच्या शब्दयोजनेतून, भाषाशैलीतून त्यांचे भावसौंदर्य वाचकांसमोर उलगडत जाते. त्यांचे सर्जनशील मन आकळते. सरदेशमुखांच्या शब्दांमागचे व पुढचे वाक्यातील संदर्भ उकलून घेतानाचे सर्जनशील वाचकाचे थांबे नव्या चिंतनाची भूमी होऊ शकतात. त्यांच्या भाषेचे वैभव केवळ शब्दयोजनेत नाही तर शब्दांपलीकडच्या सहजसंवादात आहे. शब्दयोजना अर्थजड आहे; पण वाचकांच्या मनात अर्थकाहूर माजविणारी नाही. ती प्रचलित अर्थाने सुबोध नाही; पण हृदय मोकळे करण्याचा हेतू दडवून जाणीवपूर्वक दुर्बोध होणारीही नाही. सरदेशमुखांच्या भाषेचा हा विशेष वाचकांच्या जीवनदृष्टीला समृद्ध करणारा आहे. स्वसंवेद्य करणारा आहे. ■

**'पॉवर'**

पॉवर म्हणजे वीज. पॉवर म्हणजे सत्ता. पॉवर म्हणजे सामर्थ्य, 'पॉवरस्ट्रगल' म्हणजे सत्तासंघर्ष. 'ॲब्सोल्यूट पॉवर' म्हणजे सर्वंकष सत्ता. 'डेलिगेशन ऑफ पॉवर' म्हणजे अधिकाराचे वाटप, एक प्रकारची अधिकाराची उतरंडही. 'ॲब्यूज ऑफ पॉवर' म्हणजे सत्तेचा गैरवापर. 'पॉवरहंग्री' म्हणजे सत्तापिपासू; परंतु 'पॉवरशॉर्टेज' म्हणजे वीजकपात. 'सोर्स ऑफ पॉवर' म्हणजे सत्तेचा स्रोत किंवा ऊर्जेचे स्रोत. 'पॉवरलेस' म्हणजे असहाय, 'पॉवर बिहाइंड थ्रोन' म्हणजे सिंहासनामागची (सत्ताधीशाची) खरी सत्ता, 'सुपरपॉवर' म्हणजे महासत्ता आणि 'बॅलन्स ऑफ पॉवर' म्हणजे सत्तासमतोल, 'पॉवर' शब्द कसा व कुठे वापरला जातो, यावर त्याच्या बरोबर येणारा शब्द ठरतो. त्याचा परिणाम ठरतो. अशी किती तरी उदाहरणे देता येतील.

*कुमार केतकर ('एडिटर्स चॉईस' मधील 'संस्कृतीची भाषा' ह्या लेखातून)*

# अभंगवाणी तुकयाची

सुलोचना दौलत शिंदे

लौकिकातील धनसंपत्तीकडे पाठ फिरवून शाश्वत सुखाचा शोध घेणारा, शब्दालाच ब्रह्मस्वरूप मानणारा, भागवत धर्माचा कळसाध्याय, अ-भंग वाणीचा अभंग ठेवा जनसामान्यांना देवून 'ग्यानबा-तुका' गजरातून अजरामर झालेला, बोले तैसा चालणारा आणि स्वआचरणातून नीतिमूल्ये आणि जीवनमूल्यांचा पाठ देणारा संत. परखड शब्द, बंडखोर वाणी, पराकोटीचे वैराग्य, निर्भीडता, वाणीचा प्रांजळ आणि अंतरी रसाळ, विनयाचा महामेरू, कारुण्यकणवेचा गुरू, आत्मप्रत्यय आणि आत्मानुभूतीचा ज्वलंत पाझर शब्दाशब्दांना देणारा संत. कळिकाळाला दहशत आणि दुर्जनांना धाक, सज्जनांना मात्र काळजातून हाक, धर्माचे पालन, पाषंडांचे खंडन आणि ढोंगी, कर्मकाठ, अंधश्रद्धांवर घणाघाती आघात करतानाही विश्वात्मक पावित्र्याचे स्वचारित्र्य प्रांजलतेने जगताना जगद्गुरू पदाला पोहोचलेला संतशिरोमणी म्हणजेच संत तुकाराम.

'अस्सल मराठमोळी भाषा, धगधगीत वैराग्याच्या कसोटीवर उतरलेला आत्मानुभव, अवघ्या विश्वात प्रत्ययाला येणारा विठ्ठल, वेदांनी शिकविलेली नीती प्रत्यक्षात आचरण्याची केलेली प्रतिज्ञा, दुर्जनांना थपडा देण्याची कठोरता, सज्जनांना नित्य दंडवत घालण्याची विनम्रता, भवसागरात बुडणारे जनसामान्य व त्यांचा आक्रोश न ऐकवल्याने विश्वाच्या कल्याणासाठी केलेला सधन उपदेश, एकांतात केलेल्या प्रदीर्घ अभ्यासाचे विवेकपूर्ण प्रतिबिंब अशा अनंत गुणांनी यांची अभंगवाणी अलंकृत झाली आहे. याचा अभंग कानावर न पडलेला व न वाचलेला मनुष्य सापडणे केवळ अशक्य आहे. ज्ञानेश्वरांची जशी ओवी तशी याची अभंगवाणी म्हणजे याची मानसकन्याच. याच्या अमृतवाणीला कधीही भंग नाही व याचे कारणही याने सानंद सांगितले आहे, 'तुका म्हणे झरा । आहे मुळीचाचि खरा ॥ (श्री तु॰अ॰ गाथा-३५००)' असे तुकोबांबद्दल 'भारतीय संत'मध्ये शंकर अभ्यंकर लिहितात.

अध:पतित समाजाचे दर्शन आपल्या वाणीतून परखडपणे मांडताना आळशी साधक, बुवाबाजी करणारे भोंदू आणि अज्ञानी जनांचाही समाचार तुकोबा घेतात. लोकमतापेक्षा स्वमताचा आदर करून आत्मानुभूतीतून मनोविजय प्राप्त करताना आत्मोन्नतीही मिळविणारा अणुरेणुया थोकडा आणि आकाशाएवढा तुका परमपावन ज्ञानोत्तर भक्तीचा आणि विठ्ठलाचाही लाडका भक्त भागवत अभंग राहिला तो अभंगवाणीतून, प्रस्थानत्रयीतील स्थान प्राप्त करणाऱ्या तुकोबांच्या गाथेतून.

**तुकाराम गाथा :** पु॰मं॰ लाड-संपादित गाथेत एकूण चार हजार सहाशे पाच अभंग आहेत.





अनुक्रमणिका

'मज विश्वंभर बोलवितो' म्हणत मूळचाच झरा अभंगरूपातून प्रज्ञा आणि प्रतिभेबरोबर अंत:करणही पाझरवणारा तुका. स्थूलमानाने त्यांचे साडेचार ते पाच हजार अभंग असल्याचा उल्लेखही आढळतो. तुकारामांचे अभंगच त्यांचे चारित्र्य सांगतात. सुरुवातीचा मातृपितृछत्राखालील बालपणीचा काळ लोटल्यानंतर प्रतिकूल परिस्थिती, आप्त-स्वकीयांचे मृत्यू, भीषण दुष्काळ आणि पराकोटीचे दारिद्र्य, त्यातून प्राप्त झालेले वैराग्य आणि या सगळ्याला विटलेल्या मनाने केलेला विठ्ठलाचा धावा, तुकारामांच्या अभंगातून प्रत्ययाला येतो. सांसारिक जीवन, व्यावहारिक जीवन, लोकांची वृत्ती-प्रवृत्ती आणि मनोवृत्तीतून एकांताची लागलेली आस, चिंतनाचा ध्यास आणि विठ्ठलच श्वास अशा प्रवासातून पारमार्थिक दिशेने वाटचाल करणारे तुकाराम आकाशाला व्यापून राहतात. एक एक अभंग जीवन जगण्याचा एक अस्सल अध्याय आणि अनुभूतीच्या परिपाकातून सादर जीवनामृत वाटणारा आहे. तुकारामांच्या अभंगांची जनमनावरील पकड आजही, प्रदीर्घ कालखंडानंतरही घट्ट आहे, नव्हे साध्याभोळ्या अडाणी वारकऱ्यापासून सुशिक्षित, अध्ययनशील व व्यासंगी पंडितापर्यंत हे अभंग मोहिनी घालतात. ज्ञानेशाच्या ओवीप्रमाणेच वाग्विलासिनी शारदेचा हा अभंगरूपी अलंकार, तत्त्ववेत्ते पंडित, सारस्वत आणि कुणबी, अन्नदाता कृषकही पदोपदी परिधान करतो. इतकी सुगमता, सहजता, प्रांजळता, परखडता तुकोबांच्या वाणीत मूळचीच आहे.

**तुकारामांचे अभंग :** जीवनाची डोळस जाणीव ठेवून, 'सत्य-असत्यासी मन केले ग्वाही, मानियेले नाही बहुमता' म्हणत अंतरीचे बाहेरी येऊ देणारे अभंग म्हणजे निष्ठावंत भक्ताची सूक्ष्म विवेकी आत्मसंवादी मार्गदर्शक भूमिका. जीवनानुभूतीतून आत्मानुभूती आणि आत्मानुभूतीतून जीवनानुभूतीचा आविष्कार प्रत्ययाला देणारी ही डोळस जीवनदृष्टी अनेक प्रकारच्या अभंगांना जन्म देते. त्यामध्ये करुणा, भावविश्व, परखडता, बंडखोरवृत्ती, कठोरता, चिकित्सा, पराकोटीचा लळा, जिव्हाळा आणि अंतरीचा उमाळा यातून मिरास गाजवणारी अधिकारवाणी, लहान बालकाने निरागसपणे आईला बिलगावे आणि ती केवळ त्याचीच, अशी सत्ता गाजवावी, तशी विठ्ठलावर सत्ता गाजवणारा, विठ्ठलालाच प्रश्न विचारणारा तुकोबा वाणी आणिक तीर्थव्रत न करता घरची पंढरीची वारी असणारी रीती नुसती उच्चारत नाही तर भागवत भक्तीचा कळसाध्याय ठरून जगद्गुरू म्हणून संतशिरोमणी पदाला पोहचतो आणि स्वत:बरोबर इतरानांही अंतर्मुख करतो हेच सत्य.

आत्मसंवाद आणि जनसंवाद, सहजता आणि काठिण्य, परखडता आणि कोमलता, रूपके आणि दृष्टान्त अशा परस्परविरोधी वैशिष्ट्य आणि लक्षणांनी आत्मपर, करुणापर अभंग मंडित झाले आहेत. डॉ० यशवंत पाठक यांनी तुकारामाच्या अभंगावर केलेले भाष्य

मुळातूनच अभ्यासले तर तुकारामवाणीचे आकलन अधिक सुस्पष्ट होईल. ते म्हणतात, 'सद्गुरूंनी मस्तकावर हात ठेवून 'जय जय राम कृष्ण हरी' हा बीजमंत्र दिला. राम म्हणजे ज्ञान, कृष्ण म्हणजे कर्म, हरी म्हणजे भक्ती या त्रयीतून जीवनानुभव व्यक्त होतो. या त्रयीत अवघे विश्व सामावले आहे'. स्वप्नातील गुरुकृपेनंतर त्यांना कवित्वाची स्फूर्ती झाली, शब्द हाच विठ्ठलाचे रूप झाला, शब्द हाच विठ्ठलाचा भाव झाला. प्रतिशब्द हीच विठ्ठलाच्या पायाखालची न बिटणारी वीट बनली, अर्थ हा विठ्ठलाचे राऊळ झाला, भावार्थ हाच विठ्ठलाचा अनुभव झाला यातून 'तुका म्हणे' ही मुद्रा झाली. पंचेंद्रियांच्या इंद्रायणीतून 'अभंग' वर आला आणि त्याला खोली लाभली व तो लोकमुखी सहज विराजमान झाला, असा इंद्रायणीत अभंग बुडविल्याच्या कथेचा अर्थ ते प्रस्तुत करतात, तुकारामाच्या अभंगांची वर्गवारी अभ्यासकांनी करताना प्रामुख्याने आत्मपर अभंग, करुणापर अभंग, उपदेशपर अभंग, निर्वाणपर अभंग आणि विराण्या अशी केल्याचे आढळते.

'ज्ञानेश्वरांची अभंगवाणी'मध्ये पृष्ठ क्र० ६९वर प्रा० वा०ल० कुळकर्णी म्हणतात, 'तुकारामांच्या अभंगवाणी'त भावसामर्थ्य आणि विचारसामर्थ्य सतत जाणवते, परंतु ती अभंगवाणी खडबडीत आहे, तिच्यात एक प्रकारचा रांगडा निर्व्याजपणा आणि कणखरपणा आहे. हा कणखरपणा तिची जी प्रकृती आहे म्हणजे तुकाराम ह्या मनाची जी प्रकृती आहे, त्या प्रकृतीला शोभेसा असाच आहे. ही प्रकृती एका साधकाची, समाजचिंतकाची आणि कठोर आत्मपरीक्षकाची आहे. ह्या साधनेतून आत्मपरीक्षणामधून आणि समाजचिंतनामधून जे जे अनुभवास येत आहे ते ते तुकाराम व्यक्त करू पाहतो आहे. त्याच्या अभिव्यक्तीत अनेकदा मनाची अस्वस्थता, मनाचे असमाधान, मनाच्या व्यथा व संताप व्यक्त होत आहे. परंतु एवढे खरे की, 'रात्रंदिन आम्हा युद्धाचा प्रसंग' ही उक्ती तुकारामांच्या बाबतीत हजार हिश्श्यांनी खरी आहे. तुकारामांचा अभंग म्हणजे ह्या युद्धप्रसंगांची चित्रे आहेत. 'देहूसारख्या गावातील तुकोबा वाणी, त्याच्या वाणीने विश्वात्मक जगद्गुरुपदाला पोहचला. साधकापासून प्रापंचिकापर्यंत सर्वांनाच अंतरीचे गहिरे देणे देऊन सुखावून गेला आणि कालातीत, वैश्विक मुद्रा उमटली ती म्हणजे 'तुका म्हणे' व 'ग्यानबा-तुका'. तुकारामांच्या चरित्राचे वर्णन शंकर अभ्यंकरांनी उद्धृत केले आहे, ते असे –

जयाची वदे पूर्ण वेदान्त वाणी । ह्मणावे कसे हो तया लागी वाणी ॥ परब्रह्मरूपी असा जो तुकावा । तयाचे तुकी कोण दूजा तुकावा ॥

**तुकारामांची काव्यभाषा**

अनुभवे आले अंगा । ते या जगा देतसे ॥
नव्हती हाततुके बोल । मूळ ओल अंतरिची ।

उत्तरूनी दिले कशी । शुद्धरसी सरे ते ॥
तुका म्हणे दुसरे नाही । ऐसी ग्वाही गुजरली ॥

अनुभूतीच्या पथे चालणारा हा साधक अनुभवाच्या प्रचीतीचे बोलच अनुभवाच्या मुशीतून अस्सलपणे अभिव्यक्त करतो. अभंग या छंदातून. अभंगनिर्मितीपूर्वी संतांनी रचना प्रकाराचा विचार तरी केला असेल? शब्दकोश समोर ठेवून यमकप्रधान शब्दांच्या ढिगाऱ्यातून शब्द शब्द जोडून काव्यनिर्मिती होईल का? त्यात अंतरीचा उमाळा प्रकटेल का? अशक्य! 'मज विश्वंभर बोलवितो' असं तुकोबा म्हणतात. विनयसम्राट शब्दप्रभू ज्ञानियाची ओवीसुद्धा गुरुकृपा प्रसाद आणि भाष्यकारांना, व्यासोक्तीलाच श्रेय देते, हा त्यांचा विनय. नेमकेपणाने आणि सुलभ मांडणीतून ते अनुभव साकारतात. 'सखा भगवंत वाचा त्याची' असे जरी तुकोबा वदले तरी हे प्रचीतीचे बोल, हृदयातील ओल, मनाच्या आत खोल रुजवितात हे मात्र नक्की. उपमा, प्रतिमा, प्रतीक आणि दृष्टान्त यांचा वापर, सुभाषितपरता, दैनंदिन जीवनाशी निगडित शब्दांची सहज निवड यामुळे स्वाभाविक अंगच्या गुणधर्माने मंडित अस्सल बाज लेवून वेदनांसह संवेदना आणि प्रांजलतेसह उत्कटता ही अंगचीच वाटते, ती तुकयाच्या वाणीशी एकरूप झालेली.

'सुंदर ते ध्यान, उभे विटेवरी । कर कटावरी ठेवोनिया ॥' हा अभंग किंवा 'अंतरीचे धावे । स्वभावे बाहेरी ॥ आवरिता परी । आवरेना ॥' हा अभंग असेल. शब्दाआधी भाव की भावाआधी शब्द की अजून काही? त्रिकालाबाधित वचने आणि सुभाषिते, जनमानसांत इतकी रुजली आहेत की दैनंदिन व्यवहारात कुणबी, व्यापारी, गृहिणी यांच्यापासून ते उच्च विद्याविभूषितांच्या वाणीला प्रगल्भता, परिपक्वता आणि सौंदर्यसुद्धा तुकारामांची काव्यभाषा देते. 'तुका म्हणे' ही मुद्रा मुखातून लीलया प्रकटते. आपल्या नकळत, तीही सहज! कधीच पाठ केलेली नसली तरी ती आतूनच प्रकटते इतकी ती एकरूप होते. कारण तुकोबांची काव्यशैली अनुभूतीच्या मातीतून उगवली आणि वास्तवाच्या मुशीला टक्कर देत आकाशाकडे झेपावताना ती इतस्ततः लोकमानसात, जनसामान्यांत, लौकिकात आणि अलौकिकातही सामावली, जन्म-मृत्यूच्या प्रवासात भल्याबुऱ्यांची जाण देत जगण्याचा परिपाठ देणारी ही साधी, सहज शब्दकळा संवादते, उपदेशते, पाथेय होते आणि सांत्वनाचा दिलासाही देते.'जन हे सुखाचे । दिल्या घेतल्याचे ॥ अंत या काळीचे । कुणी नाही ॥' असे तुकोबांनी म्हटले आहे. ही 'तुका म्हणे'ची मुद्रा आठवली तरी हजार हत्तीचे बळ संचारते आणि आत मुरलेला तुकोबा आतूनच सांगतो, 'सुख पाहता जवापाडे । दुःख पर्वताएवढे ॥' आणि हे असह्य सत्य आपण सहज पचवतो. शब्दचि आमुच्या, माझिये जातीचे, जेथे जातो तेथे, रात्रंदिस आम्हां, मऊ मेणाहून, कोणाही जीवाचा, यातल्या काही शब्दांचा उच्चार जरी

कानी पडला तरी पुढच्या ओळी आठवतात. मौखिक पठणासाठी ओवी, अभंग हे प्रकार सोपे-सुलभच, पण तुकोबाची वाणी एकजीव होते, तनमनात ती अंशतः नाही, पूर्णतः मुरते आणि नकळत बोलवते, चालवते, सावरते आणि मार्गही दाखवते.

तुकारामांच्या अभंगातील ही अवतरणे जनमानसात रुजली आहेत. जीवनाच्या प्रखर सत्याशी सामना करण्याचे बळ आणि स्वीकाराचे सामर्थ्य या भाषेत आहे. त्या सामर्थ्यातून जीवनाचे मूल्य आणि मोलाचे जगणे दोन्ही आकळते. त्रिकालाबाधित सत्याची वैश्विक अनुभूती शब्दरूपाचा साज आणि भावार्थाचा बाज घेऊन मानवी मनांवर राज्य करतात हे खरे. अस्सल देशी प्रतिमांचा वापर कशाचीही भीडभाड नाही, रोखठोक वाणीला सत्याची धार आणि प्रांजलाचा आधार, त्यामुळे ती थेट जशी जगण्याला भिडते तशीच ती अंतर्मनालाही ज्ञानेश्वरीप्रमाणे अमृत, चंद्र, चकोर, कमळ या प्रतिमा काव्यानुभवाची गरज म्हणून गाथेतही येतात पण मराठी मातीचा गंध मराठी मनाला तुकोबांच्या शब्दाशब्दांत आढळतो आणि तुका मेणासारखा मऊ आणि वज्रासम कठीण असूनही तो आमचाच, आपलाच वाटतो. याचप्रमाणे चंदन, सूर्य, ढग, चातक, मीन या प्रतिमाही ते समर्पकपणे योजतात.

'न लगे चंदना सांगावा परिमळ । वनस्पती मेळ हाकरूनी ॥' ना सुगंध लपतो, ना दुर्गंध, 'सत्य' सत्यच असते, ते प्रकटतेच. काव्यानुभूतीतून जीवनाचे मर्म उलगडणारी तुकारामांची वाणी काव्यभाषेचे स्वतःचे रुपडे लेवूनच येते जिव्हेवर, भरून आलेल्या मेघराजाकडे पाहून थुईथुई नाचणाऱ्या मयुराप्रमाणे मनमोराचाही पिसारा कधी फुलतो, कधी स्वतःकडेच तटस्थपणे पाहून 'तुका म्हणे'ची साद ऐकवतो.

तुकारामांच्या अभंगामधून धेनु-वत्स, कन्या-पुत्र, मायबाप, माऊली-लेकरू पती-पत्नी, सज्जन-दुर्जन, सासर-माहेर, पाप-पुण्य, स्वर्ग-नरक, जन्म-मृत्यू, तारुण्य-वार्धक्य, बुवा-बाया, इ० संकल्पनांबरोबरच आचार-विचार, रीतिरिवाज, प्रथा-परंपरा आणि व्यवहाराचेही चित्रण येते. परस्त्रीविषयीचा पूज्य भाव आणि कर्मकांडाच्या आहारी गेलेल्या बायांचा राग, चीडही व्यक्त होते. 'नवसे पुत्र होती', 'तुका म्हणे ऐशा आया', असे अभंग या दृष्टीने सांगता येतील. दुर्जनांच्या खंडनाबरोबर सज्जनांचा आदर आणि दीन-दुःखितांविषयीचा असीम कळवळाही, 'बुडती हे जन न देखवे डोळा । म्हणूनी कळवळा येत असे ॥' यातील करुणा आणि 'देव्हाऱ्यावरी विंचू आला । देवपूजा नावडे त्याला ॥ तेथ पैजारेचे काय काम । अधमासी तो अधम ॥', किंवा 'अंगा लावूनिया राख', भोंदूपणा, ढोंगीपणा आणि दैनंदिन व्यवहारात लोकांना लुबाडणारे सावकार, व्यापारी यांच्या वर्तणुकीवरही तुकोबांची वाणी शब्दाघात करते. साध्या सोप्या शब्दकळेने मंडित हृदयाचा

ठाव घेऊन तुकारामांचे भावविश्व आणि विश्वभाव आपल्या चित्रवृत्ती पुलकित करतात. 'चातुर्याच्या योगे कवित्व करिती । प्रासादिक रंग आणिता नये ॥' असे तुकोबा तत्कालीन तथाकथित कवींसंदर्भात भाष्य करतात. 'नित्य नवा दिस जागृतीचा' होऊन कवित्वाची झळाळी त्यांच्या आत्मनुभूतीच्या दिशा तेजाळू लागली. सौंदर्यांच्या या अनुभूतीतून प्रातिभ काव्याची नवनिर्मिती म्हणजे ही काव्यभाषा आणि अभंग होत.

**तुकारामांच्या निवडक अभंगांचे आकलन**

प्रातिभ दैवी देण्यातून स्फुरलेले काव्य, काव्याला अनुभूतीचा स्पर्श आणि अनुभूतीला लाभलेले रसिकत्व, रसिकत्वाला झालेला परतत्त्वाचा स्पर्श आणि नवनवोन्मेषशालिनी प्रज्ञेतून साकारलेले चिरंतन काव्य ही ज्ञानोबापासून तुकोबापर्यंतच्या संतांच्या मांदियाळीच्या काव्यस्फूर्तीची प्रेरणा आणि लक्षणे, 'बोली अरूपाचे रूप दावीन । अतीन्द्रिय परी भोगवीन । इंद्रियांकरवी ॥' अशी ज्ञानदेवांची प्रतिज्ञा तर शतकोटी अभंग पूर्तीचे, स्वप्नामाजी नामदेवांनी कवित्व स्फूर्तीचे दिलेले वचन हेच सांगते की, संतांचे आमसाक्षात्काररूपी व्यक्तित्व आणि आत्मानुभूतीचा सत्याचा शोध आणि ज्ञान हीच भक्ती यातून परतत्त्वाच्या स्पर्शाने स्फुरलेले काव्यरूप म्हणजेच संतांची प्रासादिक, आलंकारिक दृष्टान्तांनी सुशोभित जनसामान्यांना मार्गदर्शन करणारी काव्यसरिता. 'नव्हे हे कवित्व टांकसाळी नाणे', 'माझी वदवितो वाणी । ज्याणे धरिली धरणी ।', 'वचनाचा अनुभव हाती । बोलवितो देव मज ॥' याचबरोबर 'काय म्या पामरे बोलावी उत्तरे। परि त्या विश्वभरे बोलविले ।' आणि तुकोबांनी, 'सत्य-असत्यासी मन केले ग्वाही । मानियेले नाही बहुमता ॥', 'मानियेला स्वप्नी गुरूचा उपदेश । धरिला विश्वास दृढ नामी ॥' 'यावरिया जाली कवित्वाची स्फूर्ती । पाय धरिले चित्ती विठोबाचे ॥' अशा प्रकारे नामदेवांच्या प्रेरणेने आणि आदेशाने तुकारामांचा दिस नित्य नवा आणि जागृतीचा ठरू लागला आणि विठ्ठलाचा ध्यास जिवाला दिवसेंदिवस वाढू लागला. भेटीची ही आर्तता त्यांच्या अभंगांतून, काव्याविष्कृत होते आणि 'तुका म्हणे माझ्या आसावल्या बाह्या । तुज क्षेम द्याया पांडुरंगा ॥' ही आस, हा ध्यास पराकोटीचा उत्कट आहे. करुणा आणि वात्सल्याने ओतप्रोत विठूमाऊलीचा धावा करणारे अनेक अभंग भक्तीची आर्तता पटवून देतात. अशिक्षित, अक्षराची ओळखही नसलेला वारकरी तुकोबांच्या काव्यपंक्ती सहजतेने बोलतो. प्राचीन मौखिक साहित्यात जशी ओवी आया-बाया सहजतेने आळवायच्या तितकीच सहजता जाणवते. उपमा आणि दृष्टान्तांनी ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीला देशीकार लेण्याचा साज ठरविले, अमृताते पैजा जिंकणाऱ्या माय-मराठीची अस्मिता जागृत केली, तिच्यातील सौंदर्यरसांच्या अद्भुततेचा शब्दाविष्कार घडविला, त्याचप्रमाणे तुकोबांच्या अभंगवाणीनेही उपमा-दृष्टान्ताची आभूषणे परिधान

केल्याचे आढळते.

'परिमळ म्हणुनी चोळू नये फूल । खाऊ नये मूल आवडते ॥',
'धेनु चरे वनांतरी । चित्त बाळकाचे घरी ॥',
'जीवनावीण मासोळी । तैसा तुका तळमळी ॥'

कडुनिंबाच्या झाडाला साखरेचे आळे, पाषाणाला परीस, अंधाला आरसा, चंदनाच्या संगतीतील कळक, सर्पाला अन्न काय कामाचे? नामसंकीर्तनाचा सोपा मार्ग आचरणात आणून लोकांना अभंगाच्या माध्यमातून शिक्षित करण्याचा परिपाठ तुकोबांचाच नव्हे तर सर्व संतांचाच होता असे म्हणावे लागते.

तुकारामांच्या अभंगाचे नजरेत भरणारे आणि तिला अजरामर करणारे वैशिष्ट्य म्हणजे सुभाषितांची पेरणी, सुभाषितवजा रचनेमुळे तुकोबांचे अभंग 'अ-भंग' आणि कालातीत वैश्विक सत्याचा उदगार झाले. मौखिक परंपरेने ही सुभाषितमाला बोलीभाषेचा, लोकभाषेचा साज बनली आणि भाषेचे एक अंग बनलेली दिसून येते.

'लहानपण देगा देवा । मुंगी साखरेचा रवा ॥',
'जया अंगी मोठेपण । तया यातना कठीण ॥',
'सुख पाहता जवापाडे । दुःख पर्वताएवढे ॥',
'महापुरे झाडे जाती । तेथे लव्हाळे वाचती ॥',
'असाध्य ते साध्य करिता सायास । कारण अभ्यास तुका म्हणे ॥',
'देव सखा जरी । जग अवघे कृपा करी ॥',
'चित्त समाधाने । तरी विष वाटे सोने ॥',
'शुद्ध बीजापोटी । फळे रसाळ गोमटी ॥',
'चणे खावे लोखंडाचे । तेव्हा ब्रह्मपदी नाचे ॥',
'नम्र झाले भूता । तेणे कोंडिले अनंता ॥',
'आलिया भोगासी असावे सादर । देवावरी भार घालुनिया ॥'
'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती परोपकारे ॥',
'तुका म्हणे मेघ नाचवी मयुरे । लपविता खरे येत नाही ॥',
'तुका म्हणे थोरपणे । नरक होती अभिमाने ॥'

अशा सुभाषितवजा अभंगरचना मायमराठीचे अभिन्न अंग बनल्या आहेत. संवाद असो वा आत्मसंवाद 'तुका म्हणे' मुद्रा आपली सांगाती होते आणि आपल्याला मार्गाधारे चालाया पथदर्शी होते. फक्त देहाच्या वा मयुराच्या डोळ्यांनी नाही तर मर्मचक्षूंनी आर्ततेने बाह्य

पसरून तिला कवटाळायला हवे, पेलायला हवे, कारण 'तुका म्हणे मना पाहिजे अंकुश । नित्य नवा दीस जागृतीचा ॥' शब्दांचीच रत्ने आणि शब्दांचीच शस्त्रे करणारा, शब्दांचे धन जनलोकांना वाटणारा, शब्दांचीच देव म्हणून पूजा आणि गौरव करणाऱ्या तुकयाची वाणी अभंग नाही राहिली तरच नवल!

**तुका आकाशाएवढा**

ज्ञानदेव आणि तुकाराम यांच्या कार्य स्वभावाविषयी तुलना करताना गुरुवर्य प्राचार्य शं०वा० तथा सोनोपंत दांडेकर म्हणतात, 'सर्व खरे संत हे आत्मानुभवी म्हणून जरी ऐक्यभावाला पावलेले असले व जरी ते एकच भाषा बोलत असले तरी प्रत्येकाचा स्वभावधर्म हा शिल्लक राहतोच. श्रीज्ञानदेवांचे लिखाण चरित्र शोधण्याच्या दृष्टीने बघितले तर मिटलेल्या मुठीसारखे आहे. तर श्रीतुकारामबोवांचे उघड्या मुठीसारखे आहे. यामुळे एका दृष्टीने ते सोयीचे आहे. शिवाय तुकारामबोवांनी 'मी तव अनाथ अपराधी' येथून 'देव पोटी घालून गोष्टी सांगतो' येथपर्यंतच्या सर्व अवस्थांचे मोकळे कथन केले आहे, यामुळे तुकारामबोवा जवळचे वाटतात. त्यामुळेच त्यांच्या अभंगांचा अभ्यास करणे सोपे, परंतु ते ज्या अवस्थांतून गेले त्यांचा क्रम लावणे सोपे नाही' (पृ० ३४), जीवनातील अनिश्चितता, दारिद्र्य, अविश्वास, यातना, स्वार्थीपणा, अप्पलपोटेपणा, वृत्ती-प्रवृत्ती, भेदाभेद अशा अनेक बाबी व्यक्तिपरत्वे थोडेअधिक फरकाने व्यक्तीच्या वाट्याला येतातच. पाषाणातून मूर्तीला आकार आणि देवपण साकार होण्यासाठी घणाचे घाव सोसावे लागतात. ज्या पाषाणात ही क्षमता असते, त्यातून मूर्ती साकारते, मानवी जीवनातही तुकोबा वाण्याने किती पाहिले, काय काय साह्यले आणि तरी बाह्या पसरून विठ्ठलाच्या भेटीचा ध्यास घेतला, विठ्ठलाशी भांडण केले, त्याची लाजही काढली आणि भक्तांमुळेच तो पावन याची जाणीवही करून दिली.

परमार्थ साधना खऱ्या अर्थाने जाणून घ्यायची असेल तर तुकारामांचे अभंग समजून घ्यावेत, अभ्यासावेत असे गुरुदेव रा०द० रानड्यांनाही वाटते तर जीवनातल्या मानसिकतेला वळण देण्याचे काम, आधार देण्याचे काम तुकारामांच्या कवितेचे आहे असे आचार्य विनोबांना वाटते. देहाची आसक्ती सोडल्यास देवाची पंढरी आपलेच माहेर, ही अनुभूती आणि प्रवास जर सामान्यांच्याही कवेतला असता तर वेदांचे खरे मर्म मलाच माहीत आहे. त्यातील तत्त्वांचा अनुभवही, त्यामुळे शब्दज्ञानी भारवाहक पंडितांनी केवळ भारच वाहावा म्हणणारा तुकोबा आणि दुरितांचे तिमिर जाऊन विश्व स्वधर्म सूर्य पाहो म्हणून वैश्विक मांगल्याची प्रार्थना करणारा ज्ञानोबा पराकोटीच्या परमोच्च शिखराचा कळसाध्याय आणि पाया ठरले असते! 'चणे खावे लोखंडाचे । तेव्हा ब्रह्मपदी नाचे ॥' सुळावरची ही पोळी येरागबाळ्याला कशी लाभेल, येथे जातीचेच पाहिजे हेच खरे, 'तुका

म्हणे' यात आपुलकी, प्रेम, चैतन्य, सख्य, ममत्व, आपलेपणा असल्याचे अभ्यासक सांगतात.

मानवी जीवनाचा ठाव घेणाऱ्या, जीवनाला भिडणाऱ्या आणि तरीही पारमार्थिक उंचीचे परमोच्च कळस गाठणाच्या तुकारामांच्या वाणीचा वेध हा शब्दांच्या कवेत, आवाक्यात आणि अंकित होणारा नाहीच मुळी. प्रखर भानुतेजापुढे कृत्रिम लखलखाट आणि शीतल चांदण्यापुढे कृत्रिम शांततेचा निभाव लागेल? म्हणूनच या अभंगांना शरणागत व्हावे, शरण जावे, सत्यासी पहावे, आपुलीया बळे, हेच खरे असे प्रांजळपणे वाटते! शरणागत होताना, लीन होताना तुकयाच्या वाणीचा परिमळ श्वासात रेंगाळतो आणि शब्दांत उतरू पाहतो, तो असा –

विठ्ठल चरणी । तुकयाची वाणी ॥ तृप्त इंद्रायणी । शब्दाळली ॥
शब्दांचे धन । अनुभूतीप्रवण ॥ प्रचीतीचे कोंदण । भावालया ॥
व्यापलासे तुका । विठ्ठलाचा हेका ॥ अंतरीच्या हाका । विठूलाही ॥
तुकयाच्या अंतरी । विठूसह पंढरी ॥ पंढरीच्या माहेरी । दोघे तल्लीन ॥
भीमा-इंद्रायणी । तुकोबाची वाणी ॥ कौतुकते रुक्मिणी । अजूनही ॥

■

**संदर्भ**


१. जोशी प्र०न०, 'तुकारामांचे निवडक अभंग', स्नेहवर्धन प्रकाशन, पाचवी आवृत्ती, जाने० २०१२.
२. जोशी स०कृ०, 'तुका झालासे कळस', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे (पुनर्मुद्रणे १९७०, १९८५, १९८९).
३. पाठक यशवंत, 'तुकारामांचे अभंग', साहित्यसेवा प्रकाशन, औरंगाबाद, प्रथमावृत्ती.
४. धोंडगे दिलीप, 'तुका म्हणे' भाग दोन, शब्दालय प्रकाशन, पहिली आवृत्ती, १९९५.
५. अभ्यंकर शंकर, 'भक्तिकोश, द्वितीय खंड, भारतीय संत', पुणे, प्रथमावृत्ती, १९९८.
६. तुळपुळे शं०गो०, 'पाच संतकवी', १९६२.
७. सरदार गं०बा०, 'तुकाराम दर्शन', १९६८.
८. पांगारकर ल०रा०, 'मराठी वाङ्मयाचा इतिहास' खंड २, १९३५.
९. तुळपुळे ग०वि०, 'साक्षात्कार पथावर तुकाराम', पुरस्कार प्राचार्य सोनोपंत दांडेकर, २००४.

# भाषेचे चाक्षुषज्ञान : काही निरीक्षणे

**जयश्री आनंद गज्जम, मल्हार कुलकर्णी**

## प्रस्तावना

पारंपरिक संस्कृत शास्त्रकारांच्या मते, भाषा ही श्रवणप्रत्यक्षाचा विषय आहे. लिपी आणि भाषा ह्या भिन्न ज्ञानेंद्रियांनी ग्रहण केल्या जातात, असेही ते मानतात. लिपी हा चाक्षुषप्रत्यक्षाचा विषय असून ह्या चाक्षुषज्ञानाचा श्रवणज्ञानाशी असणारा घनिष्ठ संबंध, भाषेच्या चाक्षुषज्ञानासंबंधीच्या वाग्व्यवहाराचे महत्त्वाचे कारण ठरतो. आधुनिक काळात ह्या चाक्षुषज्ञानाविषयी विविध प्रकारच्या वैज्ञानिक उपकरणांच्या आधारे अधिक माहिती मिळविता येणे शक्य झाले आहे. अशाच प्रकारच्या एका उपकरणाच्या आधारे केलेल्या एका प्रयोगातून समोर आलेली, भाषेच्या चाक्षुषज्ञानाविषयीची काही प्राथमिक निरीक्षणे इथे दिली आहेत. प्रस्तुत लेखातील ही माहिती परिचयात्मक स्वरूपातील असून त्यासंदर्भात खोलवर उलगडा पुढच्या लेखांमधून करण्यात येईल.

## भाषेचे चाक्षुषज्ञान

भाषा हे मनुष्याचे विचार व भावना व्यक्त करण्याचे अत्यंत लक्षणीय व प्रभावी माध्यम आहे. वक्तव्य आणि लेखन अशा दोन पद्धतींनी भाषेची देवाणघेवाण होत असते. त्यापैकी 'जी बोलली जाते, ती भाषा' (**'भाषणात् भाषा।'**) या व्युत्पत्तीनुसार भाषेची ही देवाणघेवाण मुख्यतः वक्तव्य आणि त्याचे श्रवण यानेच होते. त्यामुळे भाषा ही श्रवणप्रत्यक्षाचाच विषय ठरते. प्राथमिक स्तरावरील भाषेचे ज्ञान हे त्या-त्या भाषेच्या श्रवणानेच होत असते. (जसे की, लहान मुलांचा भाषेशी आलेला पहिलाच संबंध, परप्रांतीय भाषा शिकणे इ०)

पारंपरिक संस्कृत शास्त्रकारांच्या मते, शब्द (ध्वनी) हे श्रवणेंद्रियांनी ग्रहण केले जात असल्याने भाषेचे ज्ञान हे मुख्यतः श्रवणेंद्रियांनीच होते. त्यामुळे भाषा ही श्रवणप्रत्यक्षाचा विषय आहे; ती चाक्षुषप्रत्यक्षाचा विषय होऊ शकत नाही. असे असताना, भाषेचे चाक्षुषज्ञान कसे होते हा प्रश्न उपस्थित होतो. ही भाषा जेव्हा लिपीच्या/ चिन्हांच्या माध्यमातून लिहिली जाते तेव्हा अशा लिखित भाषेचे ज्ञान हे वाचकाच्या चक्षुरिंद्रियांचा त्या-त्या भाषेच्या रूपाशी/चिन्हांशी/लिपीशी झालेल्या संयोगामुळेच होतो. थोडक्यात, ***'भाषेचे चाक्षुषज्ञान' म्हणजे वाचकाच्या नेत्रेंद्रियांचा त्या-त्या भाषेच्या लिपीशी आलेला संयोग (चाक्षुष) व त्यानंतर त्याला झालेले आकलन (ज्ञान) होय.*** या चाक्षुषज्ञानाचा त्या भाषेच्या श्रवणज्ञानाशीच संबंध असतो. प्रस्तुत निबंधात विशेषेकरून चाक्षुषज्ञानावर चर्चा केलेली आहे. हे भाषेचे चाक्षुषज्ञान लिखित भाषेपुरतेच मर्यादित आहे.

संस्कृत पारंपरिक शास्त्रकारांनी कुठेही भाषेच्या चाक्षुषज्ञानावर चर्चा केलेली आढळून येत नाही. गेल्या काही ५० वर्षांपूर्वीपासून भाषेविषयीच्या बोधप्रक्रियेचा अभ्यास मनोभाषाविज्ञानामध्ये (Psycholinguistics) होत असलेला दिसून येतो. भाषाविज्ञानाचा आधार घेता असे म्हणता येईल की, वाचकाला लिखित भाषेचे ज्ञान होण्यासाठी त्या-त्या भाषेची लिपी, त्यातील शब्द व शब्दार्थ, भाषेची वाक्यरचना, तसेच वाक्यातील शब्दांचा एकमेकांशी असलेला संबंध वा शब्दार्थशास्त्र यांचे ज्ञान असणे गरजेचे असते. याशिवाय, त्या-त्या वाक्याचा नेमका तोच अर्थबोध होण्यासाठी त्या वाक्याचा मागच्या व पुढच्या वाक्यांशी असलेला संदर्भ, वाक्यातील विरामचिन्हे यांचीही मदत होते.

भाषेचे चाक्षुषज्ञान होण्यासाठी महत्त्वाचा, प्राथमिक मार्ग म्हणजे भाषेचे 'वाचन'- 'वाचकाच्या डोळ्यांचा भाषेच्या लिपीशी आलेला संयोग' होय. एखादा मजकूर वाचत असताना वाचक त्या मजकुरातील प्रत्येक वर्णाशी, शब्दाशी आणि परिणामतया त्यातील वाक्यांशी, आपला चक्षु:संयोग घडवून आणत असतो. वाचत असताना वाचकाच्या डोळ्यांची हालचाल ही सलगरेषेत व सारख्या गतीने होत नसून, वाचकाच्या डोळ्यांच्या, पुढे-मागे अशा अनेक मंद-जलद हालचाली होत असतात वा काही वेळा डोळ्यांची स्थिरता असलेली दिसून येते, हे मत सर्वप्रथम फ्रेंच राजकारणी व नेत्रतज्ज्ञ लुई एमिल् जवाल् (१८३९-१९०७) यांनी इसवी सन १८७९मध्ये मांडले. (विकिपीडिया.) डोळ्यांच्या हालचालींची नोंद घेता यावी यासाठी अनेक मनोभाषाशास्त्रज्ञांनी वेगवेगळ्या प्रकारच्या उपकरणांचा शोध लावला. त्यापैकी एक म्हणजे 'Eye Tracker' होय. Eye Trackerद्वारे मिळालेल्या माहितीतून, १९व्या शतकातील संशोधकांना एक नवीन शोध लागला. तो म्हणजे, वाचकाच्या डोळ्यांच्या या वेगवेगळ्या हालचालींवरून वाचकाच्या आकलनप्रक्रियेचा अभ्यास करता येतो. थोडक्यात, वाचकाद्वारे होणाऱ्या या सगळ्या प्रयत्नांचा अभ्यास करणे म्हणजे जणू वाचकाच्या ठिकाणी होत असलेल्या भाषेच्या चाक्षुषज्ञानाचाच (बोधप्रक्रियेचा) अभ्यास करणे होय. भाषेचे चाक्षुषज्ञान कसे होते, हे समजून घेणे म्हणजेच, वाचकाचा भाषेशी झालेला चक्षुसंयोग आणि त्याच्या बुद्धीमध्ये झालेली बोधप्रक्रिया समजून घेणे होय.

२०व्या शतकात अनेक आधुनिक यांत्रिक व सांख्यिकीय माहितीचा वापर करून अत्यंत प्रगत असे Eye Tracker उपकरण (नाव- 'SR Eyelink 1000 Plus') तयार करण्यात आले व तेव्हापासून चाक्षुषज्ञानाच्या संशोधनाला अधिक विश्वासार्हता प्राप्त झाली. अनेक संशोधकांनी [(Groner, 1985); (Rayner, 1998), (Starr, 2001)] केलेल्या अभ्यासांद्वारे असे दिसून आले की, वाचकाच्या डोळ्यांची झालेली हालचाल ही त्याच्या

ठिकाणी होत असलेल्या ज्ञानाचेच द्योतक आहे. या यंत्राचे नाव 'SR Eyelink 1000 Plus eye-tracker' असे आहे. तंत्रज्ञानदृष्ट्या प्रगत असे दोन संगणक, एक छायाचित्रक आणि एक इन्फ्रारेड इल्यूमिनेटरची सोय असलेले हे उपकरण आहे. दोन संगणकांपैकी एका संगणकासमोर बसून वाचकाला दिलेला मजकूर वाचावयास सांगितले जाते. दुसऱ्या संगणकावरून संचालक प्रयोग-संचालनाचे काम करतो. वाचकाच्या समोर असलेल्या छायाचित्रकाच्या मदतीने वाचकाच्या डोळ्यांमधील बुब्बुळे टिपली जातात, तर इन्फ्रारेड इल्यूमिनेटरद्वारे बुब्बुळाच्या हालचाली टिपल्या जातात. काही सांख्यिकीय तत्त्वांचा (Mathematical algorithms) वापर करून डोळ्यांच्या हालचाली व संगणकावरील मजकूर यांची सांगड घातली जाते. थोडक्यात, वाचक वाचत असताना नेमक्या कोणत्या शब्दावर त्याची दृष्टी पडली आहे, किती वेळ तो शब्द वाचला गेला आहे, कोणते शब्द वगळले आहेत, कोणत्या ओळी पुन्हा मागे जाऊन वाचल्या गेल्या आहेत या व अशा अनेक हालचालींची माहिती या गणितीय आकडेवारीच्या मदतीने कळते. नंतर या वेगवेगळ्या प्रकारच्या हालचालींचा मापदंड म्हणून उपयोग केला जातो, ज्याच्या आधारे व्यक्तीच्या ठिकाणी होत असलेल्या आकलनाविषयीचा उलगडा होतो.

एका प्रयोगामध्ये एकूण २० वाचकांना, संस्कृत भाषेतील गद्य व पद्य मजकुराचे वाचन करावयास सांगितले. या प्रयोगातून समोर आलेली, भाषेच्या चाक्षुषज्ञानाविषयीची काही निरीक्षणे इथे मांडलेली आहेत. वाचताना करण्यात आलेल्या अनेक प्रयत्नांपैकी तीन प्रकारचे प्रयत्न हे सर्वतोपरी महत्त्वाचे आहेत [(Lai, 2013); (Rayner, 1998); (Mishra, 2013)]: सलगपणे वाचणे (दृक्पातः), एखाद्या शब्दावर जास्त काळ दृष्टी ठेवणे (दृगवसायः) व एखादा शब्द वगळणे (दृग्गलनम्). या तीन प्रकारच्या प्रयत्नांची चर्चा इथे केली आहे. या सर्व प्रयत्नांना मिळून 'दृक्पातधारामार्गः' (Scan-Path) असे म्हणतात. 'दृक्' हा शब्द Gaze या इंग्रजी शब्दाला पर्यायी शब्द म्हणून घेतला आहे. त्याचा अर्थ वाचकाचा संगणकावरील मजकुरावर होणारा दृष्टिक्षेप होय. भाषेच्या चाक्षुषज्ञानामध्ये 'दृक्' हे करण/साधन ठरते, तर चक्षुःसंयोग हा कारण ठरतो. वाचकाद्वारे घडत असलेले विविध प्रयत्न इथे दिलेले आहेत.

**दृक्पातः (Gaze Point)** : वाचकाने वाचताना सरळरेषेत केलेले वाचन किंवा मागे जाऊन पुन्हा केलेले वाचन म्हणजे 'दृक्पातः'. याचे दोन प्रकार आहेत -

**१.१. दृक्पातधारा (Saccades)** : वाचक वाचत असताना सरळरेषेतच सलगपणे केलेले वाचन म्हणजे 'दृक्पातधारा'. दिलेला मजकूर सोपा, असंदिग्ध, अपेक्षित वा पूर्वपरिचित असेल तर वाचकाला त्याचे आकलन होण्यास काही अडचणी येत नाहीत.

अशा वेळी जे वाचन केले जाते, ते सरळरेषेत सलगपणे केले जाते. परंतु, वाचकाच्या वाचनाच्या गतीनुसार व मजकुराच्या प्रकारानुसार त्यातील सलगता विविध प्रकारची असू शकते. सोप्या/पूर्वपरिचित/असंदिग्ध मजकुरावरील व जलद गतीने वाचतानाची दृक्पातधारा ही कमी दाटीवाटीची असते; तर कठीण/अपरिचित/संदिग्ध मजकुरावरील व कमी वेगाने

वाचणाऱ्या  वाचकाची दृक्पातधारा जास्त दाटीवाटीची असल्याची दिसून येते. चित्रात दाखविलेल्या रेषा या वाचकाच्या डोळ्यांच्या हालचालींना दर्शवितात. या दोन्हीतला फरक हा त्या-त्या वाचकाच्या ठिकाणी होणाऱ्या चाक्षुषज्ञानावर प्रकाश टाकतो (Rayner, 1998).

**१.२. दृक्परिनिवर्तनम् किंवा दृक्पृष्ठगामित्वम् (Regression or Back-tracking) :** अनेकवेळा वाचक वाचत असताना सरळरेषेतच सलगपणे वाचत असतो असे नाही. तो एकच शब्द पुन्हा पुन्हा वाचतो (सामासिक, क्लिष्ट वा मोठे शब्द) (Mishra

A.A., 2016). काही वेळा संपूर्ण वाक्यच किंवा सबंध परिच्छेद पुन्हा वाचतो. या मागे जाऊन वाचण्याच्या प्रयत्नालाच 'दृक्परिनिवर्तनम्' किंवा 'दृक्पृष्ठगामित्वम्' असे संबोधतात. याची अनेक कारणे असू शकतात- जसे की, संदिग्धता, शब्दांचा लहान वा कमी आकार (font), चुकीचा शब्द, वगळलेले शब्द, अनपेक्षित शब्द वा वाक्यरचना, आकलनातील अडथळे इत्यादी. आकलनातील अडथळा हेच यामागचे सर्वात महत्त्वाचे व हमखास कारण असल्याचे संशोधनांद्वारे (Rayner, 1998) सिद्ध केलेले आहे. चित्रात दाखविल्याप्रमाणे, एकाच वाचकाचे मजकुराच्या काठिण्यानुसार वेगवेगळ्या प्रकारचे दृक्पृष्ठगामित्व असल्याचे दिसून येते.



वाचकाच्या ठिकाणी होत असलेल्या चाक्षुषज्ञानाविषयी जाणून घ्यायचे असेल तर त्याचे पृष्ठगामित्व जाणणे गरजेचे ठरते. जास्त पृष्ठगामित्व हे चाक्षुषज्ञानातील बाध सूचित करतो, तर कमी पृष्ठगामित्व आकलनातील सहजता सांगतो (Rayner, 1998).

**२. दृगवसायः (Fixations)** : अनेकदा वाचक एकाच शब्दावर जास्त काळ रेंगाळतो वा लक्ष/ दृष्टी केंद्रित करतो. या अपेक्षेहून जास्त काळ (१००-५०० मिलीसेकंद) व्यतीत करण्याला 'दृगवसायः' असे संबोधतात. शास्त्रज्ञांच्या मते, दृगवसायाच्या वेळीच वाचक नवीन माहिती मिळवत असतो. शब्दावर त्याने व्यतीत केलेला जास्त काळ हा त्या-त्या शब्दाची त्या-त्या मजकुरातील आवश्यकता (महत्त्व) सूचित करतो (Mishra A.A., 2016); (Rayner, 2009). याशिवाय प्रत्येक वाचकाचे त्याच्या भाषेवरील प्रभुत्वानुसार वेगवेगळ्या मजकूरांवर वेगवेगळे दृगवसाय होत असल्याचे दिसून येते. अनपेक्षित शब्दामुळे वाचक त्या शब्दांवर जास्त काळ रेंगाळत असल्याचे दिसूने येते. थोडक्यात, अनपेक्षित शब्द हा त्याच्या ठिकाणी होत असलेल्या आकलानाच्या प्रक्रियेमध्ये बाध आणतो, परिणामी वाचक काही काळ घालवून संदिग्धता सोडवण्याचा प्रयत्न करतो.

**३. दृगलनम् (Skip)** : वाचक प्रत्येकवेळी मजकुरातील सर्वच्या सर्व शब्द वाचतो असे नाही. आकलनाच्या दृष्टीने बिनमहत्त्वाचे शब्द वगळण्याची त्याची प्रवृत्ती असते (Rayner, 2009). अशा प्रकारच्या शब्द वगळण्याच्या प्रयत्नाला 'दृगलनम्' असे म्हणतात. अनेकवेळा यांमध्ये लहान शब्द म्हणजे अव्यये, सर्वनाम यांचा समावेश होतो. वाक्याचा अर्थ समजण्यासाठी एकूणातच कोणत्या



शब्दांची आवश्यकता असते व कोणते शब्द वगळले तरीही अर्थबोध होण्यास तितकी अडचण येत नाही, हे या प्रकारच्या वाचकाच्या प्रयत्नांवरून जाणून घेता येते.

कस्मिंश्चित् अधिष्ठाने [illegible] मित्रे प्रतिवसतः स्म। तौ च बाल्यात्प्रभृति सहचारिणौ परस्परम् [illegible] स्नेहपरौ एकैकस्थान-विहारिणौ कालं नयतः। अथ कदाचित् तत्राधिष्ठाने कस्मिंश्चित् देवायतने यात्रा-महोत्सवः संवृत्तः। तत्र च नट-नर्तक-चारण-संकुले नानादेशागत-जनावृते तौ सहचरौ भ्रमन्तौ कांचित् राजकन्यां करेणुका-रूढां सर्वलक्षण-सनाथां कञ्चुकि-वर्षधर-परिवारितां देवता-दर्शनार्थं समायातां दृष्टवन्तौ। अथासौ [illegible] तां दृष्ट्वा विषार्दित इव दुष्टग्रहगृहीत इव कामशरैः हन्यमानः सहसा भूतले निपपात।

नमन्ति फलिनो वृक्षा नमन्ति गुणिनो जनाः।

शुष्कवृक्षाश्च मूर्खाश्च भिद्यन्ते न नमन्ति च॥

अशा प्रकारे, वाचकाच्या वेगवेगळ्या प्रकारच्या चक्षु:संयोगाद्वारे लिखित भाषेचे चाक्षुषज्ञान होत असलेले दिसून येते.

या चाक्षुषज्ञानावरील प्रयोगाद्वारे जी निरीक्षणे उपलब्ध झाली त्याचा अलीकडच्या काळात वेगवेगळ्या क्षेत्रात वापर केलेला दिसून येतो. उदाहरणार्थ, आकलनप्रक्रिया समजून घेणे [(Ambati); (Choudhary, 2011); (Husain, 2014); (Khan, 2017); (Rayner, 1998) (Rayner, 2009)], भाषेतील संदिग्धता सोडविणे (Joshi S.a., 2013), वाक्याचा अचूक अर्थ ठरविणे (Joshi A.a., 2014); (Mishra A.a., 2016)], भाषांतरातील काठिण्याचे निदान करणे (Mishra A.a., 2013), भाषेतील उपरोधाचा शोध [(Mishra A.a., 2016) (Mishra A.a., 2017)], याशिवाय अलीकडच्या काळात, कृत्रिम बुद्धिमत्तेच्या 'मशिन लर्निंग' या शाखेमध्ये संशोधन करणाऱ्या अभ्यासकांनी अत्यंत प्रगत अशा संगणकांची निर्मिती करण्यासाठी, वाचकांच्या चक्षु:संयोगाच्या माहितीचा तसेच काही सांख्यिकीय तत्त्वांचा आधार घेऊन संबोधरूप प्रारूपे तयार केली जात आहेत, जी संगणकाला भाषेविषयीच्या वेगवेगळ्या कामांमध्ये मदत करतात (Mishra A.a., 2013). काही संशोधकांनी मानवी मेंदूशी निगडित अशा आजारांनी त्रस्त अशा रुग्णांच्या चाक्षुषज्ञानाचा आधार घेऊन त्यांच्या वाचन व आकलनाविषयीच्या समस्या सोडविण्याचा





अनुक्रमणिका

प्रयत्न केला आहे. (Levy, 2012) यांनी वाचनदोष (Dyslexia), वाचाघात/वाचा-अक्षमता/वाग्विकृति (Aphasia) या वाचनाशी संबंधित अशा आजारांनी त्रस्त अशा रुग्णांचा; तर (Caplan, 1986) यांनी छिन्नमनस्क (Schizhophrenic) व्याधिग्रस्त रुग्णांच्या चाक्षुषज्ञानाचा अभ्यास केला. याशिवाय, इतर काही संशोधने (Hochstadt, 2006) सुसंबद्ध-वाचा-अक्षमता (Agrammatism), स्मृतिभ्रंश (Amnesia), कंपवाताने (Parkinson's Disease) त्रस्त अशा रुग्णांच्या चाक्षुषज्ञानावर आधारित आहेत. अशा प्रकारे भाषेच्या चाक्षुषज्ञानाच्या अभ्यासाची उपयुक्तता आकलनप्रक्रियेचा अभ्यास करण्यासाठी तसेच त्या भाषेच्या सखोल अभ्यासासाठीही आहे.

**सारांश**

भाषा ही मुख्यतः श्रवणप्रत्यक्षाचा विषय असली तरी बहुतांशी वेळा ती चाक्षुषप्रत्यक्षाचाही विषय होते, याविषयीची चर्चा या निबंधात केलेली आहे. भाषेचे चाक्षुषज्ञान हे लिखित भाषेपुरते मर्यादित असून या ज्ञानामागे वाचकाची 'दृष्टि'/'दृक्' हे करण/साधन ठरते, तर वाचकाचा दिलेल्या भाषेच्या लिपीशी झालेला 'चक्षुःसंयोग' हे कारण ठरते. वाचकाद्वारे वेगवेगळ्या प्रकारचा जो चक्षुःसंयोग (दृक्पातधारा, दृक्परिनिवर्तनम्, दृगवसायः, दृग्गलनम् इत्यादी) घडून येतो, त्याची काही आधुनिक, वैज्ञानिक उपकरणांद्वारे नोंद घेता येऊ शकते आणि या अभ्यासातून जी निरीक्षणे उपलब्ध होतील, त्यांच्या आधारे मानवी मस्तिष्कातील आकलनाचा/बोधप्रक्रियेचा आढावा तर घेता येतोच. त्याशिवायही वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये त्याचा उपयोग होत असलेला दिसून येतो.

प्रस्तुत लेखात चाक्षुषज्ञानाविषयीची काही प्राथमिक निरीक्षणे परिचयात्मकवजा देण्यात आलेली असून ती एका मोठ्या प्रकल्पाचा एक भाग आहे, असे म्हणता येईल. या प्रकल्पाचा मुख्य उद्देश हा Eye-Tracker या आधुनिक वैज्ञानिक उपकरणाचा वापर व्यक्तीच्या ठिकाणी होत असलेल्या शब्दबोधाचा अभ्यास करण्यासाठी कसा होतो हे अभ्यासणे आहे. यासाठीचे मुख्य साधन म्हणजे वाचकाच्या डोळ्यांची हालचाल होय. तसेच या अभ्यासातून समोर आलेल्या निरीक्षणातून त्या-त्या भाषेच्या रचनेविषयी अधिक उलगडा करणे हाही उद्देश आहे. अनेक व्यक्तींच्या, वेगवेगळ्या भाषांच्या वाचनामधून, त्यांच्या डोळ्यांच्या हालचाली अभ्यासून त्यातून काही समान धागे शोधून त्याचा वापर काही प्रारूपांची निर्मिती करणे हे अंतिम ध्येय आहे.

■

## संदर्भ


१. Ambati, B.R. (n.d.). Effect of jumbling intermediate words in Indian languages: An eye-tracking study.

२. Caplan, D.a. (1986). Assignment of thematic roles to nouns in sentence comprehension by an agrammatic patient. *Brain and Language, 27*(1), 117-134.

३. Choudhary, K.K. (2011). *Incremental argument interpretation in a split ergative language: neurophysiological evidence from Hindi.*

४. Groner, R. (1985). Eye movements and human information processing. *9.*

५. Hochstadt, J.a. (2006). The roles of sequencing and verbal working memory in sentence comprehension deficits in Parkinson's disease. *Brain and language, 97*(3), 243-257.

६. Husain, S.a. (2014). Integration and prediction difficulty in Hindi sentence comprehension: evidence from an eye-tracking corpus. *Journal of Eye Movement Research, 8*(2).

७. Joshi, A.a. (2014). Measuring Sentiment Annotation Complexity of Text. *Association of Computational Linguistics.* Association for Computational Linguistics.

८. Joshi, S.a. (2013). More than meets the eye: Study of Human Cognition in Sense Annotation. *HLT-NAACL*, 733-738.

९. Khan, A.a. (2017). On the Eye Movement Control of Changing Reading Direction for a Single Word: The Case of Reading Numerals in Urdu. *Journal of Psycholinguistic Research*, 1-11.

१०. Lai, M.-L.a.-J.-Y.-Y.-C.-Y.-H.-L.-C.-C. (2013). A review of using eye-tracking technology in exploring learning from 2000 to 2012. *Educational Research Review, 10*, 90-115.

११. Levy, J.H. (2012). Effects of syntactic complexity, semantic reversibility, and explicitness on discourse comprehension in persons with aphasia and in healthy controls. *American Journal of Speech-Language Pathology, 21*(2), S154-S165.

१२. Mishra, A.a. (2013). Automatically Predicting Sentence Translation Difficulty. *Proceedings of the 51st Annual Conference of Association for Computational Linguistics (ACL), Sofia, Bulgaria.*

१३. Mishra, A.a. (2016). Harnessing Cognitive Features for Sarcasm Detection. *arXiv preprint arXiv:1701.05574.*






अनुक्रमणिका

१४. Mishra, A.a. (2016). Predicting Readers' Sarcasm Understandability by Modeling Gaze Behavior. *AAAI*, (pp. 3747-3753).
१५. Mishra, A.a. (2017). Leveraging cognitive features for sentiment analysis. *arXiv preprint arXiv:1701.05581.*
१६. Rayner, K. (1998). Eye movements in reading and information processing: 20 years of research. *Psychological bulletin, 124*(3), 372.
१७. Rayner, K. (2009). Eye movements and attention in reading, scene perception, and visual search. *The quarterly journal of experimental psychology, 62*(8), 1457-1506.
१८. Starr, M.S. (2001). Eye movements during reading: Some current controversies. *Trends in cognitive sciences, 5*(4), 156-163.

**नियतकालिकांच्या नोंदणीसंबंधातील केंद्र शासनाच्या नियमानुसार निवेदन**

| | |
|---|---|
| नियतकालिकाचे नाव | मराठी अभ्यास परिषद पत्रिका – भाषा आणि जीवन |
| प्रकाशन-काल | त्रैमासिक |
| प्रकाशन-स्थळ | B-5/16 सनसिटी, सिंहगड रस्ता, आनंदनगर, पुणे 411 051. |
| संपादक-मुद्रक-प्रकाशक | आनन्द काटीकर |
| राष्ट्रीयत्व | भारतीय |
| पत्ता | वरीलप्रमाणे |
| मालक | मराठी अभ्यास परिषद |
| पत्ता | वरीलप्रमाणे |

मी, आनन्द काटीकर, असे निवेदन करतो की, वर दिलेला तपशील माझ्या माहितीप्रमाणे बरोबर आहे.

आनन्द काटीकर
प्रकाशक
मराठी अभ्यास परिषद पत्रिका –
भाषा आणि जीवन

## महाराष्ट्र राज्य शासनाचा मराठी भाषा विभाग व राज्य मराठी विकास संस्था
## अशोक केळकर मराठी-भाषा-अभ्यासक-पुरस्कार
### मानपत्र

**सन्माननीय प्रा॰ डॉ॰ आर॰ विवेकानंद गोपाळ, तंजावर,**

स्नेहपूर्वक नमस्कार.

भाषाव्यवहार, साहित्य-समीक्षा, विविध ललितकला, सौंदर्यशास्त्र, तत्त्वज्ञान, समाजशास्त्र, शिक्षणपद्धती इत्यादी विद्याशाखांसंबंधीचे व्यासंगयुक्त लेखन, मराठी अभ्यास परिषदेची पायाभरणी, भारतीय विद्याक्षेत्रात भाषाविज्ञान क्षेत्राची केलेली 'रुजुवात' अशा विविधांगी योगदानातून अभ्यास-अध्यापन-संशोधनाच्या क्षेत्रात मानदंड बनलेले आंतरराष्ट्रीय कीर्तीचे दिवंगत भाषाशास्त्रज्ञ अशोक रा॰ केळकर ह्यांच्या नावे महाराष्ट्र शासनाने सुरू केलेला 'मराठी-भाषा-अभ्यासक-पुरस्कार' अध्यापन, लेखन आणि भाषांतर या माध्यमांतून मराठी व तमीळ भाषा तसेच मोडी लिपी ह्यांत गेली अनेक वर्षे सेतूबांधणीचे काम करत असलेल्या आपल्यासारख्या ज्येष्ठ बहुभाषाविद अभ्यासकास प्रदान करताना आम्हांस अत्यंत आनंद होत आहे.

छत्रपती श्री शिवाजी महाराजांचे बंधू व्यंकोजी महाराज भोसले यांनी तामिळनाडूतील तंजावर येथे मराठा साम्राज्याची स्थापना केली आणि तंजावरचे महाराष्ट्राशी ऋणानुबंध जुळले. पुढे साहित्यिक अभिरुचिसंपन्न अशा सरफोजी भोसले महाराजांच्या काळात हे संबंध अधिकच बहरले. मराठी-तमीळ या भाषाभगिनींचा हा नातेप्रवाह पुढे नेण्याचेच नव्हे, तर समृद्ध करण्याचे कार्य आपण गेली अनेक वर्षे समर्थपणे करत आहात.

तंजावर येथून मराठी भाषेची पदविका घेतल्यानंतर पुण्यात मराठी साहित्यात पदव्युत्तर शिक्षण घेतले. त्यानंतर, पुण्याच्या डेक्कन महाविद्यालयातील डॉ॰ उषा रानडे यांच्या मार्गदर्शनाखाली मध्ययुगीन मराठी भाषेचे अध्ययन व दोन वर्षे मोडी लिपीचे प्रशिक्षण घेतले.

प्राचीन भारतीय इतिहास आणि भाषावैभव समजून घेताना दुर्मिळ हस्तलिखिते अत्यंत महत्त्वाचा ऐवज आहे, हे जाणून आपण मोडी लिपीचा स्वतः अभ्यास केला आणि त्यानंतर गेली अनेक वर्षे या लिपीच्या अध्यापनाचे कार्य आपण करत आहात. त्यासाठी तंजावरच्या सुप्रसिद्ध 'सरस्वती महाल' ग्रंथ संग्रहालयात आपण मोडी आणि मराठी भाषा प्रशिक्षणाचे १२ अभ्यासक्रम तयार केले आहेत. तंजावरच्या या वाचनालयात मोडी भाषेतील अनेक दुर्मिळ हस्तलिखिते आपण मराठी भाषेत अनुवादित करुन मराठी साहित्याला एक समृद्ध खजिनाचा उपलब्ध करुन दिला आहे.

कुप्पमच्या द्रविडीयन विद्यापीठात गेली ११ वर्षे प्राध्यापक म्हणून कार्यरत असतानाच, मराठी आणि तमीळ या भाषांमधला सेतू म्हणून आपण काम करत आहात. 'लावणी काव्यप्रकाराचा चिकित्सक अभ्यास' या विषयात मराठी आणि तमीळ, अशा दोन्ही भाषांमध्ये अध्ययन करून आपण डॉक्टरेट मिळवली आहे. तंजावर येथे १९८७ साली युवराज तुळजेन्द्र राजा टी॰ भोसले यांच्या अध्यक्षतेखाली





अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषदेची आपण स्थापना केली. या परिषदेचे सचिव म्हणून तामिळनाडूतील मराठी नागरिकांना मराठी शिकवण्याचे काम आपण तीन दशकांहून अधिक काळ अव्याहतपणे करत आहात.

मोडी लिपीतील हस्तलिखितांच्या अनुवादासह, मराठी आणि तमीळ भाषेत आपली विपुल साहित्यसंपदा आहे. त्यात, तंजावरी मराठी-लावणी गीते, लक्ष्य लक्षण पांडे-शहाजी महाराज, मराठी पाळणा संग्रह, बिल्हण काव्य, लावणीचा इतिहास आणि विकास, क्षत्रिय मराठा कुळ आणि त्यांचे विभाजन असे अभ्यासग्रंथ आहेत.

सिद्धहस्त विदुषी इरावती कर्वे यांचे 'युगान्त' हे अजरामर पुस्तक, साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त लेखक श्याम मनोहर यांचे 'यकृत' हे नाटक आपण तमीळ भाषेत अनुवादित केले. त्याशिवाय, 'डॉ॰ बाबासाहेब आंबेडकर लेखन आणि भाषणे (खंड १८) तीन भाग, डॉ॰ जी॰ एम॰ पवार लिखित 'विठ्ठल रामजी शिंदे यांचे जीवनकार्य', सुप्रसिद्ध लेखक भालचंद्र नेमाडे यांचे 'टीकास्वयंवर', अरुण खोपकर यांचे चित्रपटविषयक लेखन 'चलत-चित्रव्यूह' अशा दर्जेदार मराठी ग्रंथांना तमीळ भाषेत अनुवादित करण्याचे कार्य आपण करत आहात. तमीळ साहित्यातील सुप्रसिद्ध ग्रंथ 'थिरूक्कुरल'चा आपण मराठीत अनुवादही केला आहे.

विशेष म्हणजे, हे अध्ययनाचे कार्य स्वत:पुरते मर्यादित न ठेवता, तामिळनाडूच्या विविध शहरांमधल्या वाचनालयांत असलेल्या दुर्मिळ दस्तऐवजांचे जतन व्हावे, यासाठी आपण अनेक वर्षे शासनदरबारी पाठपुरावा केला.आपल्या प्रयत्नांना यश येऊन दस्तऐवजांचा हा ठेवा जतन करण्यासाठी महाराष्ट्र शासनाने एक कोटी रुपयांचा निधी मंजूर केला. या निधीतून गेल्या सात वर्षांत तब्बल पाच लाख मोडी कागदपत्रांचे डिजिटलीकरण करण्यात आले. तर, पुढच्या टप्प्यात आणखी पाच लाख हस्तलिखितांचेही डिजिटलीकरण केले जाणार आहे. केवळ भाषाच नव्हे, तर भारतीय संस्कृती आणि इतिहासाचे ज्ञान देणारा हा अमूल्य ठेवा चिरंतन करत पुढच्या अनेक पिढ्यांपर्यंत हा वारसा पोहचवण्याचे आपले हे कार्य मराठी भाषेच्या इतिहासातील सुवर्णपान ठरावे असेच आहे.

आपल्या या कार्याची यथोचित दखल घेत, महाराष्ट्राबाहेर मराठी भाषा आणि साहित्य यांचा प्रसार केल्याबद्दल २००२मध्ये जयपूर येथे झालेल्या बृहन्महाराष्ट्र मंडळ परिषदेत तत्कालीन लोकसभा अध्यक्ष मनोहर जोशी यांच्या हस्ते आपला विशेष गौरव करण्यात आला होता. मराठी साहित्य, इतिहास आणि मराठा संस्कृती यांवर आकाशवाणी आणि दूरदर्शनवर आपण अनेक व्याख्याने सादर केली आहेत.

दक्षिण भारतात मराठी भाषा आणि साहित्याची पताका दिमाखाने उंचावत ठेवण्याचे अमूल्य कार्य केल्याबद्दल 'अशोक केळकर मराठी-भाषा-अभ्यासक-पुरस्काराने' आपला गौरव करून राज्य शासनाच्या वतीने आपल्या कार्याला आम्ही अभिवादन करत आहोत. आपले अध्यापन, अध्ययन आणि भाषासंवर्धनाचे कार्य असेच पुढेही सुरू राहील, या विश्वासासह आपल्या भावी जीवन-कार्यासाठी आमच्या मन:पूर्वक शुभेच्छा!

(दि॰ २७ फेब्रुवारी २०२०)





अनुक्रमणिका

**महाराष्ट्र राज्य शासनाचा मराठी भाषा विभाग व राज्य मराठी विकास संस्था**
**मंगेश पाडगावकर मराठी-भाषा-संवर्धक-पुरस्कार**
**मानपत्र**

**सन्माननीय श्री० अनिल श्रीपाद गोरे,**

स्नेहपूर्वक नमस्कार.

ज्येष्ठ कविवर्य दिवंगत मंगेश पाडगांवकर यांनी आपल्या काव्यप्रतिभेसह अनुवादकौशल्याने मराठी वाङ्मयविश्व समृद्ध केले. संत मीराबाई, कबीर, सूरदास यांच्या संतवाङ्मयाप्रमाणेच शेक्सपिअरच्या नाट्यकृती आणि बायबलचाही अनुवाद करून सरस्वतीच्या या सुपुत्राने मराठी मनाला सांस्कृतिक संपन्नता बहाल केली. त्यांच्या स्मृतिप्रीत्यर्थ राज्यशासनातर्फे दिला जाणारा 'मंगेश पाडगांवकर मराठी भाषा संवर्धक पुरस्कार' मराठी भाषा संवर्धनाच्या विविध पैलूंवर अथक काम करणाऱ्या आपणांस प्रदान करताना अत्यंत आनंद होत आहे.

मराठी भाषेच्या संवर्धनासाठी आपण एक डोळस भाषांतरकार, जागरूक प्रकाशक आणि सजग कार्यकर्ता अशा भूमिकांतून जाणीवपूर्वक केलेले कार्य उल्लेखनीय, स्पृहणीय आणि अनुकरणीय आहे.

व्यवहारामध्ये मराठीचा अधिकाधिक उपयोग करता येण्यासाठी आपण सरकार-दरबारी तसेच सामाजिक वर्तुळात नियोजनबद्ध प्रयत्न केलेत. त्याचेच फलित म्हणून २०१०पासून आतापर्यंत निरनिराळ्या बँकांमध्ये तब्बल ७ अब्ज कागद मराठीतून छापले गेले. तसेच शैक्षणिक, प्रशासकीय, वित्तीय आदी क्षेत्रांतील सुमारे ७० हजार पानांचे आपण इंग्रजीतून मराठीत रूपांतर केलेत.

मराठीकरणाचा उपयोग सिद्ध करण्यासाठी मराठी माध्यमातील शिक्षणाचा राज्यभर प्रसार करण्याचे व्रत अंगीकारत, पाचशेपेक्षा अधिक व्याख्यानांद्वारे तसेच समाजमाध्यमांच्या मदतीने आपण अभिनव पद्धतीने जनजागृती केली. राज्यातील ३ लाख ११ हजार विद्यार्थ्यांनी इंग्रजी माध्यम सोडून मराठी शाळांमध्ये घेतलेले प्रवेश, हीच याची फलश्रुती होय!

ज्ञानभाषा म्हणून मराठीचे महत्त्व ठळक करण्यासाठी आपण प्रकाशन व्यवसायात उतरून इयत्ता अकरावी व बारावीसाठी भौतिकशास्त्र, रसायनशास्त्र, जीवशास्त्र आणि कृषिविज्ञान या विषयांच्या मराठी पाठ्यपुस्तकांची निर्मिती केलीत. इतकेच नव्हे तर, आय०आय०टी० अर्थात भारतीय तंत्रज्ञान संस्थेची प्रवेशपरीक्षा व 'नीट' परीक्षा, मराठीतून घेण्यासाठी आपण केलेला पाठपुरावाही यशस्वी झाला.

दैनंदिन व्यवहारात मराठी भाषेचे उपयोजन वाढविण्यासाठी आपण कल्पकतेने विविध प्रयोग केलेत. व्यापारी, कारखानदार आणि उद्योजकांना मराठी जाहिरातीचे महत्त्व पटविणे,





अनुक्रमणिका

अमराठी व्यक्तींना मराठी शब्दांची तोंडओळख करून देणारे सोपे खेळ प्रचलित करणे अशा नाना क्लृप्त्यांनी समाजाच्या विविध स्तरांमध्ये मराठीचा दैनंदिन उपयोग वाढविण्यासाठी, 'आवाहन व प्रबोधन' या द्विसूत्रीच्या आधारे आपण कार्यरत राहिलात.

राज्यशासनाच्या भाषा सल्लागार समितीचे सदस्य म्हणून ८ वर्षे काम सांभाळताना आपण भाषाधोरणाबद्दल अनेक बहुमोल सूचना केल्या असून मराठी भाषाधोरणाचे प्रारूप आता तयार झाले आहे. 'कृषी परिभाषा कोशाच्या' उपसमितीचेही आपण सदस्य आणि समन्वयक आहात. पुणे महानगरपालिकेची मराठी भाषा संवर्धन समिती, मराठी विज्ञान परिषदेचा पुणे विभाग, पुणे जिल्ह्यातील गणित अध्यापक मंडळ, मराठी साहित्य परिषद अशा महत्त्वपूर्ण संस्थांचे आपण सदस्य आहात. जगभरातील ग्रंथसंपदेचे मराठीत भाषांतर करण्यासाठी लोकमान्य टिळक, न्या० म०गो० रानडे, संस्कृत पंडित डॉ० भांडारकर प्रभृतींनी १८९४मध्ये स्थापन केलेल्या 'महाराष्ट्र ग्रंथोत्तेजक संस्थेचे' निमंत्रित कार्यकारिणी सदस्य म्हणूनही आपण कार्यरत आहात. या विविध पदांच्या जबाबदाऱ्या पेलताना आपल्या मराठीविषयक कार्याचा आणखी विस्तार झालेला दिसून येतो.

शिक्षणाने व पेशाने गणिताचे अभ्यासक व अध्यापक असणारे आपण सुसूत्रता, शिस्त व कल्पकता या अंगभूत गुणांच्या जोरावर मराठी भाषेच्या संवर्धनाचे कार्य, वयाबरोबरच दुणावणाऱ्या उत्साहाने सांभाळत आहात ही गोष्ट विशेष वाखाणण्यासारखी वाटते. त्यामुळेच, 'आता समाजाकडून समाजाला मराठी आरक्षणाचे दान मिळावे, आणि त्यायोगे लक्षावधी मराठी युवक-युवतींना रोजगार मिळावा' अशा अभिनव कल्पना आजही आपल्या मनाच्या मातीत मूळ धरत आहेत.

आपले कार्य बघून कविवर्य माधव ज्यूलियन यांच्या काव्यपंक्तींचे स्वाभाविक स्मरण होते. 'मराठी माऊलीला असणारी यशाची दिव्य आशा' सार्थ ठरविणाऱ्या आपल्या उत्तुंग कर्तृत्वाला, या पुरस्काराच्या रूपाने अभिवादन आणि भावी वाटचालीसाठी शुभेच्छा !

(दि० २७ फेब्रुवारी २०२०)

## *लेखक-परिचय*

**काटीकर,** आनन्द : एम०ए०, पीएच०डी०, फर्ग्युसन महाविद्यालयात मराठी विषयाचे सहयोगी प्राध्यापक, 'भाषा आणि जीवन'चे प्रमुख संपादक.
चलभाष : 94216 10704; ई-पत्ता : anand.katikar.marathi@gmail.com

**कार्लेकर,** वैशाली : एम०ए०, नितीन प्रकाशन, पुणे येथे कार्यकारी संपादक, मराठी व्याकरणाच्या अभ्यासक, बालसाहित्य लेखिका (१४ पुस्तके प्रसिद्ध), मराठी अभ्यास परिषदेच्या कोषाध्यक्ष.
चलभाष : 94203 22982; ई-पत्ता : vaishali.karlekar1@gmail.com

**गज्जम,** जयश्री आनंद : एम०ए० (संस्कृत), सध्या भारतीय प्रौद्योगिकी संस्थान (आय०आय०टी०), मुंबई येथे वाचस्पती पदवीसाठी संशोधन चालू.
चलभाष : 99701 56096; ई-पत्ता : jayashree1aanand@gmail.com

**देशपांडे,** देविदास : मुक्त पत्रकार, गेली बारा वर्षे पत्रकारितेत कार्यरत. यापूर्वी 'आज का आनंद', 'केसरी', 'सकाळ' आणि 'पुणे मिरर' (टाइम्स ऑफ इंडिया समूह) येथे वरिष्ठ वार्ताहर. आठ भारतीय तसेच फ्रेंच व जर्मन या भाषांची ओळख. 'Maharashtra Herald', Rediff.com, Yahoo! Voices, American Chronicle, LeMagIT ह्या संकेतस्थळांसाठी नियमित लेखन.
चलभाष : 87967 52107; ई-पत्ता : devidas.desh@gmail.com

**पाटंगणकर,** विद्यासागर : एम०ए०, पीएच०डी०, बलभीम महाविद्यालय, बीड येथे मराठीचे प्राध्यापक (आता सेवानिवृत्त), डॉ० बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद येथे संशोधन मार्गदर्शक, १६ विद्यार्थ्यांचे संशोधन पूर्ण, संतसाहित्याचे अभ्यासक, जवळपास १४ पुस्तके आणि विविध लेख प्रसिद्ध.
चलभाष : 94200 87021; ई-पत्ता : vpatangankar@gmail.com

**बिनीवाले,** अविनाश : एम०ए०,पीएच०डी०, जर्मन विषयाचे सेवानिवृत्त प्राध्यापक, भाषा आणि संस्कृती या विषयात ७० पुस्तके प्रसिद्ध; चलभाष : 98239 11243

**शिंदे,** सुलोचना दौलत : अहिल्यादेवी प्रशाला, पुणे येथे शिक्षिका, एम०ए०, बी.एड., एम.एड., सेट, मराठी कथा, कविता लेखनाचा छंद, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठात वाचस्पती पदवीसाठी संशोधन चालू.
चलभाष : 75583 74456; ई-पत्ता : sdsahilya17@gmail.com

**साळुंखे,** नितीन अनंत : मूळचे सिंधुदुर्ग जिल्ह्यातील वैभववाडी तालुक्यातील खांबाळे या गावचे. सध्या मुक्काम मुंबईत. इतिहास, भाषा, शब्दांचा जन्म, देव, धर्म, संस्कृती, प्रथा, परंपरा यांचा शोध घेण्याची विशेष आवड. जनता सहकारी बँक, पुणे येथून सेवानिवृत्त. बांधकाम व्यवसाय, ज्योतिष शास्त्राचा अभ्यास, मुंबईतील ऐतिहासिक पाऊलखुणांचा मागोवा ह्या नावाने स्वतंत्र अनुदिनी-लेखन.
चलभाष : 93218 11091

## तंजावूर येथील डॉ. विवेकानंद गोपाळ यांना महाराष्ट्र शासनाचा 'अशोक केळकर भाषा-अभ्यासक' पुरस्कार






## प्रा. अनिल गोरे यांना महाराष्ट्र शासनाचा 'मंगेश पाडगावकर भाषा संवर्धक' पुरस्कार



व्यासपीठावर मा. मुख्यमंत्री उद्धव ठाकरे, मराठी भाषा मंत्री सुभाष देसाई आणि अन्य मान्यवर.

